

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष ५८ । अंक ८ । मे २००५

## 'संमत'- विचाराविषयी 'सह' मत
डॉ. मो.गो. धडफळे



## गोतावळा
द.तु. पाटील

## विज्ञानाची अस्वाभाविक विचारपद्धती
श्री.मा. भावे

## शेक्सपीअरची शोकनाट्ये
परशुराम देशपांडे

## भांडवलशाही आणि भारताचे भवितव्य
गं.रा. पटवर्धन

## जीर्णोद्धार - 'सभारंजनी'
श्री.मा. भावे

अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५८। अंक ८। मे २००५
जेष्ठ, शके १९२६
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.






संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका






# नवभारत

मे २००५

## अ नु क्र म





अनुक्रमणिका

# विज्ञानाची अस्वाभाविक विचारपद्धती

**परिचायक : श्री.मा. भावे**

विज्ञान आणि सामान्य समजूत (कॉमन सेन्स) यांच्यात जवळचे नाते आहे, असे म्हणतात. डार्विनचा बुद्धिमान सहकारी थॉमस हेन्री हक्सली हा तर म्हणत असे की, विज्ञान म्हणजे सामान्य समजुतीचेच अधिक प्रशिक्षित आणि सुघटित रूप आहे. तत्त्वज्ञ व गणिती असणारा आल्फ्रेड नॉर्थ व्हाईटहेड याचा असा हुरूप आणणारा दावा होता की, 'विज्ञानाची मुळे सामान्य समजुतीत रोवलेली आहेत'. ही मते वर-वर पाहता सुजाणपणाची वाटली तरी वस्तुतः ती दिशाभूल करणारी आहेत. विज्ञानाने निर्माण केलेल्या संकल्पना आणि वैज्ञानिक विचारांची प्रगती या दोन्ही गोष्टी अंतःप्रज्ञेला (इंट्यूशन) आणि सामान्य समजुतीला झुकांडी देणाऱ्या आहेत. माझ्या म्हणण्याचा रोख असा आहे की, वैज्ञानिक संकल्पना जगातील घटनांचे निरीक्षण करून सुचतील अशा प्रकारच्या नसतात आणि दैनंदिन अनुभवाच्या कक्षेत त्या बसत नाहीत. आपल्या स्वाभाविक अपेक्षांना धरून विज्ञानाचा व्यापार चालत नाही.

'सामान्य समजूत' ही काही सामान्य गोष्ट नाही. जगाचा अनुभव घेताना मनुष्याने माहितीचा जो अगडबंब साठा निर्माण केला आहे, त्याचे व्यक्त रूप म्हणजे 'सामान्य समजूत'. रोजच्या व्यवहारात वावरण्यासाठीचे ठोकताळे आपणास सामान्य समजुतीतून मिळतात व त्यातील कित्येक ठोकताळे तर्काला धरूनही असतात. 'सामान्य समजूत' ही आपल्या दैनिक वागणुकीत इतकी मिसळून गेलेली असते की, आपल्याला तिचे भान क्वचितच राहाते. 'सामान्य समजूत' या संकल्पनेचा आणखी विचार आपण पुढे करूच.

विज्ञान व सामान्य समजूत यांची तुलना करताना विज्ञानाची व्याख्या कशी करायची हा निकडीचा प्रश्न निर्माण होतो. काटेकोर व्याख्या देणे काही सोपे नाही. तेव्हा काही उदाहरणांच्या आधाराने अशी तुलना करणे उत्तम.

विज्ञानाचे चांगले उदाहरण म्हणजे भौतिकी (फिजिक्स). निसर्ग म्हणजे आपण राहातो ते जग. त्या जगातील घटनांचा खुलासा हे शास्त्र (भौतिकी) अगदी सखोल पद्धतीने करते. पदार्थांची गती (मुव्हमेंट), प्रकाश व ध्वनी यांचे स्वरूप (नेचर), उष्णता व विद्युत (इलेक्ट्रिसिटी), द्रव्याची (मॅटर) मूलभूत घटना अशा कितीतरी आविष्कारांचे (फिनॉमेना) स्पष्टीकरण भौतिकी हे शास्त्र अगदी थोड्या तत्त्वांच्या आधाराने करते. या आविष्कारांचे स्पष्टीकरण देण्यासाठी काटेकोर सिद्धान्त रचण्यात आले आहेत. हे सिद्धान्त पडताळून त्यांचा खरे-खोटेपणा तपासता आला पाहिजे, ही अपेक्षा हे सिद्धान्त रचताना ठेवलेली असते. जर पुराव्याच्या आधारावर या सिद्धान्तात सुधारणा करावी लागली किंवा तो सिद्धान्त निकालात काढावा लागला, तर तसे करण्याची भौतिकीची तयारी असते. पडताळणीची जी प्रक्रिया आहे, तिच्या मागील गृहीत हे आहे की, हे सर्व आविष्कार त्रयस्थ अभ्यासकाला गोचर आहेत; कारण वैज्ञानिक ज्ञान हे सर्वगम्य (पब्लिक) आहे.

विज्ञान हे नेहमी बाह्यसृष्टीविषयी बोलते व वैज्ञानिक सिद्धान्ताचे प्रत्यंतर वास्तवात येते किंवा नाही यावर त्या सिद्धान्तांचे यश ठरते. आविष्कारांचे स्पष्टीकरण देणे आणि नवीन घटनांचे सूचन करणे हे सिद्धान्ताच्या चांगलेपणाचे निकष आहेतच; खेरीज, सिद्धान्ताचा सोपेपणा (सिंप्लिसिटी) आणि सफाईदारपणा (एलीगन्स) हेही चांगलेपणाचे निकष आहेत. शिवाय, वैज्ञानिक वारंवार सांगत असतात की, चांगल्या वैज्ञानिक उपपत्तीने (थियरी) नवे व मनोवेधक (इंटरेस्टिंग) प्रश्न उभे केले पाहिजेत.

'आपल्या प्रयोगांचा मेळ घालून ते एका तर्काच्या साखळीत बसवणे' हे विज्ञानाचे कार्य होय, असे आईन्स्टाईनचे मत होते. वैज्ञानिक संकल्पनांना राशींच्या भाषेत (क्वांटिटिटिव्ह टर्म्स) मांडण्याचे मोठे काम गणित करते. त्यामुळे विज्ञानाचे कार्य पुढे नेण्यास गणिताचा महत्त्वाचा उपयोग होतो. लॉर्ड केल्व्हिन हा १९व्या शतकातील नामवंत भौतिकीशास्त्रज्ञ होता. ज्या गोष्टीविषयी विचार चालू आहे, ती गोष्ट मोजता आली व आकड्यात मांडता आली, तरच ती आपल्याला कळली असे म्हणता येईल, असे केल्व्हिनचे मत होते. हे मत एका टोकाचे व चुकीचे होते; पण विज्ञानाची जी कार्यपद्धती आहे, तिच्यात संकल्पनांना गणिती काटेकोरपणाने मांडणे या गोष्टीला अतिशय महत्त्वाचे स्थान आहे. न्यूटनचे गतिनियम हे या कार्यपद्धतीच्या यशाचे एक थक्क करणारे उदाहरण आहे.








काही इनेगिने मूलभूत गतिनियम व गणित यांच्या सहाय्याने सृष्टीतील विविध प्रकारच्या गतींचा खुलासा आपण करू शकतो. मग ती विमानांची झेप असो की टेनिस अथवा बिलियर्ड्सच्या चेंडूचे टप्पे असोत.

भौतिकीची विचार-पद्धती किती अस्वाभाविक आणि न पटणारी आहे, याचे उत्तम उदाहरण म्हणजे गतिशास्त्र होय. ज्यांनी भौतिकीचे शिक्षण घेतलेले नाही अशा लोकांच्याही गतीविषयी काही समजुती असतात व त्यांच्या आधाराने ते लोक पदार्थ कोणत्या मार्गाने जाईल याचा अंदाज बांधू शकतात. परंतु असे आढळते की, हे अंदाज चुकीचे ठरतात. उदा. एका विमानातून बॉम्ब टाकला तर तो जमिनीवर कोठे पडेल, असे विचारले, तर विद्यार्थ्यांचे उत्तर बहुधा चुकलेले असते. विद्यार्थी उत्तर देतो की, ज्या ठिकाणाहून विमानाने बॉम्ब टाकला त्याच्या बरोबर खाली, जमिनीवर, तो बॉम्ब आदळेल. पण उत्तर खरे असे आहे की, बॉम्ब जमिनीशी पोचेपर्यन्त विमान ज्या ठिकाणी पोचलेले असते त्या ठिकाणाच्या बरोबर खाली बॉम्ब जिथे पडतो ती जागा असते. हा गोंधळ होण्याचे कारण असे की, विमानाची पुढे जाण्याची क्षितिज समांतर गती बॉम्बला मिळालेलीच असते व तिच्यावर बॉम्बच्या खाली पडण्याच्या क्रियेचा काहीच परिणाम होत नाही, ही गोष्ट विद्यार्थी लक्षात घेत नाही. हाच मुद्दा अधिक परिणामकारक रीतीने स्पष्ट होण्यासाठी दुसरे उदाहरण घेऊ. समजा की, एक मनुष्य मैदानात उभा आहे. तो एका हाताने बंदुकीची गोळी उडवतो व दुसऱ्या हाताने तसलीच गोळी खाली टाकतो. यातली कोणती गोळी जमिनीवर आधी पडेल? दोन्ही गोळ्या एकाच वेळी जमिनीवर पडतील, कारण गोळीची खाली पडण्याची क्रिया व बंदुकीतून उडविलेल्या गोळीची क्षितिज समांतर जाण्याची क्रिया, या दोन स्वतंत्र क्रिया आहेत. बंदुकीतून उडविलेली गोळी मैदानाच्या समांतर जाते आहे या क्रियेचा गुरूत्वाकर्षणामुळे ती खाली पडते आहे या क्रियेशी काही संबंध नाही.

आपल्या पैकी अनेकांना वाटते की, एका ठिकाणी थांबून असणे ही पदार्थाची नैसर्गिक स्थिती आहे. पण गतिशास्त्र सांगते की, समान वेगाने चालत राहाणे ही (देखील) पदार्थाची नैसर्गिक स्थिती आहे. एखाद्या पदार्थाला गती दिली आणि त्या पदार्थाला थांबवणारी शक्ती उपस्थित नसेल, तर त्या पदार्थाची गती कायमच राहाते. सतराव्या शतकाच्या सुरूवातीला गॅलिलिओने ही क्रांतिकारक कल्पना मांडली. तोपर्यंत, समजुतीला पटेल अशी, ॲरिस्टॉटलची गतिविषयक मांडणी प्रचलित होती. ॲरिस्टॉटलचे म्हणणे असे होते की, पदार्थाची गती चालू राहावी यासाठी तिला सतत शक्ती (फोर्स) लावावी लागते. या बाबतीत गॅलिलिओचा युक्तिवाद असा होता. समजा, एक अगदी सपाट व गुळगुळीत प्रतल (प्लेन) आहे व एक वाटोळा व गुळगुळीत चेंडू आहे. समजा की, हे प्रतल किंचित तिरके आहे. त्याच्यावर हा चेंडू सोडला. काय होईल? चेंडू सतत घसरत जाईल. तो थांबणारच नाही. त्याचा वेग वाढत राहील. या उलट, चेंडू जर याच तिरक्या प्रतलावर आपण खालून वर, प्रतलाला चिकटून, फेकला तर त्या चेंडूचा वेग कमी होत जातो. निष्कर्ष असा की, प्रतल जर क्षितिजसमांतर ठेवले तर गती निरंतर राहील. 'जर गती समान (युनिफॉर्म) असेल तर ती कमी होणार नाही, दिशा बदलणार नाही व संपणारही नाही.' तेव्हा सपाट प्रतलावर कसलाच प्रतिरोध (रेझिस्टन्स) नसल्याने मुळात दिलेली गती कायम राहाते व नव्याने शक्ती न लागताही चेंडू हालतच राहातो. सारांश, वस्तूची नैसर्गिक स्थिती ही आहे की, ती समान वेगाने एका सरळ रेषेत चालत राहाणे. याला न्यूटनचा गतिविषयीचा पहिला नियम म्हणतात. वस्तुस्थितीत चेंडू गतिमान राहात नाही, थांबतो. याचे कारण असे की, घर्षण ही गतिविरोधी शक्ती वस्तुस्थितीत हजर असते. गॅलिलिओने हा जो अकटोविकट बदल आपल्या विचारव्यूहात घडवून आणला, त्यावरून हे समजून येते की, अज्ञाताची मांडणी ज्ञाताच्या सहाय्याने करणे इतकेच काम विज्ञान करीत नाही तर पुष्कळदा ज्ञाताचा खुलासा अज्ञाताच्या आधाराने करण्याची विज्ञानाची पद्धत असते.

गॅलिलिओ आणि न्यूटन यांनी गतीची जी संकल्पना रचली त्या पेक्षा 'गतीसाठी शक्तीची सतत योजना करावी लागते' ही ॲरिस्टॉटलची कल्पना आपल्याला जास्त सोपी वाटते. चेंडू वर फेकला तर त्याच्या गतीमागे कोणती शक्ती लावलेली आहे, असे विचारले असता विद्यार्थी सांगतो की, ऊर्ध्वगामी शक्ती चेंडूमागे लावलेली आहे; आणि हे उत्तर अगदी स्वाभाविक आहे. पण खरी गोष्ट अशी आहे की, चेंडू एकदा हातातून सुटला की, त्यावर कोणतीच ऊर्ध्वगामी शक्ती कार्य करीत नसते; उलट गुरुत्वाकर्षण ही अधोगामी शक्तीच चेंडूवर कार्य करीत असते. वर विचारलेला प्रश्न काही सोपा नाही आणि गॅलिलिओही इथे गडबडला होता. पण इथे काही गफलत आहे, हे त्याला समजले होते. गतिविषयीचा न्यूटनचा

दुसरा नियम या प्रश्नावर प्रकाश टाकतो. एखादी शक्ती पदार्थाला लावली की, पदार्थाच्या गतीत बदल होतो. ती वाढते किंवा कमी होते. या बदलाला प्रवेग (ॲक्सीलरेशन) असे नाव आहे. जर घर्षण किंवा गुरुत्वाकर्षण अशा, गतीला विरोध करणाऱ्या शक्ती उपस्थित नसतील, तर वर फेकलेला चेंडू सतत वरच जात राहील. गुरुत्वाकर्षण ही शक्ती चेंडूला जमिनीकडे खेचणारा प्रवेग देते; म्हणजेच जमिनीपासून दूर नेणारी जी मूळची गती आहे तिच्यात प्रतिप्रवेग (रिटार्डेशन) निर्माण करते. त्यामुळे चेंडूचा ऊर्ध्वगामी वेग कमी होत जातो व अखेरीस चेंडू खाली पडू लागतो.

फिलोपोनस या पंडिताने ६व्या शतकात आणि जॉन ब्युरिडान नावाच्या पंडिताने १४व्या शतकात 'इंपेटस' नावाची संकल्पना मांडली होती. सामान्य मनुष्याची गतीबद्दलची भोळी समजूत या 'इंपेटस' संकल्पनेशी मिळती-जुळती असते. एखाद्या पदार्थाला गती देताना त्या पदार्थावर शक्तीचा आघात करावा लागतो, असे ही संकल्पना सांगते; आणि गती कायम राहाण्यासाठी शक्तीचा आघात सतत चालू ठेवावा लागतो. न्यूटनने त्याचे गतिशास्त्र मांडल्याला तीनशे वर्षे झाल्यानंतरही आघात अथवा 'इंपेटस' याच्याच आधाराने सामान्य माणसे गतीचा खुलासा करतात, यावरून 'इंपेटस' ही संकल्पना स्वाभाविक आहे व न्यूटनचे गतिशास्त्र मनुष्याच्या अंत:प्रज्ञेला (इंट्यूशन) न पटणारे आहे, हेच कळून येते.

भौतिकीच्या अंत:प्रज्ञाविरोधी स्वभावाचे आणखी एक उदाहरण म्हणजे प्रकाशाच्या शुभ्रतेचे न्यूटनने दिलेले स्पष्टीकरण, हे होय. नेहमीचा पांढरा प्रकाश हा सात निरनिराळ्या रंगांच्या प्रकाशांचे मिश्रण असतो, असे न्यूटनने दाखवून दिले. इंद्रधनुष्यातील सात रंग जेव्हा परस्परात मिसळतात तेव्हा पांढरा रंग तयार होतो.

एखादा पदार्थ जळतो, तेव्हा काय होते, याचा विचार 'फ्लॉजिस्टॉन' या सिद्धान्ताने १८व्या शतकात मांडला. ॲरिस्टॉटलचे म्हणणे असे होते आणि सामान्य समजूतही हीच असते की एखादा पदार्थ जळतो तेव्हा त्या पदार्थातून काही तरी बाहेर पडते. हे जे काही बाहेर पडते त्याला 'फ्लॉजिस्टॉन' असे नाव लोकांनी दिले होते. पण सामान्य समजुतीला धरून असणारा हा सिद्धान्त चुकीचा ठरला. 'जळणे' या क्रियेतील मुख्य घटना ही की, जळताना हवेतील प्राणवायू जळणाऱ्या पदार्थात घेतला जातो; पदार्थातून काही गोष्ट बाहेर पडते, असे नव्हे.

अगदी साधी गोष्ट घ्या. पाण्यात रंगाचा ठिपका टाकला असता रंग पाण्यावर पसरतो. या गोष्टीचा सामान्य समजुतीला पटणारा खुलासा व विज्ञानाने केलेला खुलासा यांत भलताच फरक आहे. एका तस्तात पाणी घेतले व त्यात शाईचा थेंब एका बाजूला टाकला की थोड्या वेळात शाई तस्तभर पसरते. हे पसरणे कशामुळे होते? सामान्य समजूत अशी की, थेंबाला शाईचे जे एकवटलेपण किंवा 'संहती' असते तिच्यामुळे शाईचे कण ढाकलले जातात व पाण्यावर पसरतात. पण विज्ञान सांगते की, शाईच्या थेंबातील एकवटलेपण वगैरे काही नाही; थेंबातील शाईचे कणही (मोलेक्यूल्स) इतस्तत: फिरतच असतात व थेंब पाण्यात पडला की, त्यांच्या फिरण्याला वाव मिळतो. शाई कोणत्या दिशेने पाण्यात पसरत जाईल याचा अंदाज बांधता येत नाही (यावरून हे सिद्ध होते). पदार्थातील कणांच्या कंपनाशी पदार्थाच्या तपमानाचा (टेम्परेचर) संबंध आहे, हे तरी कोणाला पटण्याजोगे आहे?

काळ, आकार व अंतरे यातील जे फरक दैनंदिन व्यवहारात अनुभवाला येतात त्यापेक्षा कितीतरी पटीने मोठे असे या तीन बाबतीतील फरक विज्ञानाला विचारात घ्यावे लागतात. रेणू (मोलेक्यूल्स) हे किती बारीक असावेत, याची कल्पनाही करता येणार नाहीत. समजा आपण एक भांडेभर पाणी घेतले, आणि त्यातील प्रत्येक रेणूला काही रंग दिला. नंतर ते पाणी समुद्रात ओतले व समुद्र घुसळून ते पाणी त्यात पूर्ण मिसळून टाकले. नंतर पुन: भांडेभर पाणी समुद्रातून उचलून घेतले, तर त्या भांड्यात तुम्हाला मुळात समुद्रात सोडलेले काही रंगीत रेणू आलेले दिसतील! याचा अर्थ असा की, एका भांडेभर पाण्यात असणारी रेणूंची संख्या समुद्रात जितके भांडी पाणी आहे त्या भांड्यांच्या संख्येपेक्षा जास्त आहे! मनुष्याच्या हाताच्या बोटात पृथ्वीवर जितकी माणसे आहेत त्याच्या पेक्षा जास्त पेशी आहेत! भूशास्त्रात (जिऑलॉजी) विचारात घेतले जाणारे कालखंड लाखो-करोडो वर्षांचे असतात. मोठमोठे पर्वत आणि पाताळापर्यंत खोल भासणाऱ्या दऱ्या या कुठल्या प्रलयंकारी उलथापालथींतून घडवल्या गेल्या नाहीत तर आज देखील ज्या नैसर्गिक शक्ती उपस्थित आहेत त्यांच्याच दीर्घकाळ चाललेल्या कार्यातून त्या निर्माण झाल्या, हा शोध भूशास्त्राला एकोणिसाव्या शतकात लागला व ही भूशास्त्राची स्पृहणीय जीत मानली गेली.

अनुक्रमणिका

आपल्याला सहज-समजुतीने बरोबर वाटणाऱ्या गोष्टी कशा चुकीच्या ठरतात याचे एक साधे उदाहरण पाहा. समजा की, आपण विषुववृत्तावर एक दोर घट्ट आवळला. यासाठी २५००० मैल लांबीचा दोर लागेल. नंतर असे समजू या की, या हा दोर तीन फुटांनी वाढवला आणि विषुववृत्तापासून सर्व बाजूंनी उचलला. तर दोर व जमीन यात केवढ्या उंचीची फट राहील? आपल्याला वाटते की, २५००० मैलात तीन फुटांनी असा काय फरक पडणार? परंतु, गणित करून पाहिल्यास कळेल की, ही फट सहा इंच उंचीची असेल आणि फटीची ही उंची पृथ्वीचा घेर किती आहे यावर अवलंबून नाही. घेर २५ मैलाचा असो की, २,५०,००० मैलाचा, फट सुमारे ६ इंच उंचीचीच राहील. (प्रत्यक्षात ही फट ५.८/११ इंच असेल.)

सारांश, मनुष्याची सहज समजूत आणि वैज्ञानिक सत्य यांच्यात बहुतेक वेळा मोठी तफावत आढळते. असे अगदी क्वचितच होते की, आपल्याला सहजी जे बरोबर वाटते ते आणि वैज्ञानिक सत्य एकच असते. असे एक उदाहरण म्हणजे ओहमचा नियम. हा नियम असे सांगतो की, विद्युत् मंडळातून विजेचा प्रवाह घालवताना प्रवाहाला जेवढ्या प्रमाणात विरोध असेल तितक्या प्रमाणात विजेचा दाब वाढवावा लागतो. आपल्या समजुतीला पटेल असा हा नियम आहे. पण बहुधा असे दिसते निसर्गाची रचना व निसर्ग-नियम यांचा आपल्या दैनंदिन अनुभवाशी क्वचितच मेळ बसतो. आपल्या अनुभवावरून निसर्गाच्या नियमांचे अनुमान करता येईल, अशी स्थिती नसते. पृथ्वी सूर्याभोवती फिरते हा निष्कर्ष आपल्या रोजच्या अनुभवाच्या अगदी विरुद्ध आहे. गेली कित्येक वर्षे, पिढ्यान्‌पिढ्या, आपल्याला शिकवण्यात आले म्हणून आपण ते खरे मानतो, इतकेच. या विधानाला पुरावा देणे फार अवघड आहे. बर्ट्रांण्ड रसेलने म्हटले आहे की, आपण एक प्रकारच्या भोळसटपणाने वस्तुस्थितीकडे पाहतो आणि जशी वस्तुस्थिती दिसते तशीच ती आहे, असे धरून चालतो. आपण समजतो की, गवत हिरवे असते, दगड कठिण असतो व बर्फ थंड असतो. पण भौतिकी आपणास सांगते की गवताचे हिरवेपण, दगडाचा कठिणपणा आणि बर्फाचा थंडपणा हा आपल्या अनुभवातील हिरवेपणा, कठिणपणा किंवा थंडपणा नसून काही निराळ्याच प्रकारचा आहे. अर्थशास्त्राच्या बाबतीत हीच परिस्थिती आहे. या विषयातील नोबेल पारितोषिक विजेते हेन्री मीड यांनी आपल्या थडग्यावर खालील लेख कोरावा, असे म्हटले आहे :

"या मनुष्याने आयुष्यभर अर्थशास्त्र जाणण्याचा प्रयत्न केला; पण सामान्य समजुतीचा अडथळा तो पार करू शकला नाही".

विज्ञान ही विचार करण्याची केवळ अस्वाभाविकच नव्हे तर गोंधळवून टाकणारी पद्धती आहे, ही गोष्ट ॲरिस्टॉटलच्या ध्यानात स्पष्टपणे आली होती. तो म्हणतो, "वस्तुस्थितीचे नीट आकलन होण्यासाठी आपल्या मनाची जी सहज विचारवृत्ती आहे, ती पूर्णपणे उलटी-सुलटी करून टाकावी लागते. विचाराची सुरुवात होते तीच मुळी आपण कुठल्या तरी अनुभवाने बुचकळ्यात पडल्यामुळे. उदा. आपल्या आढळते की, चौरसाच्या कर्णाची लांबी आपल्याला चौरसाच्या बाजूच्या पटीत मोजता येत नाही. ज्या कुणी असे का होते याचा विचार केलेला नाही, त्याला ही गोष्ट अचंबा करण्याजोगी वाटते. पण विचार केल्यानंतर ध्यानात येते की, कर्णाची लांबी बाजूच्या लांबीच्या पटीत मोजता यावी अशी मुळात आपण अपेक्षा ठेवली तीच चूक होती. कर्णाची लांबी बाजूच्या मापात मोजता येऊ लागली तर गणिताच्या दृष्टीने तीच गोंधळवून टाकणारी गोष्ट ठरेल!"

इथे ॲरिस्टॉटल पायथागोरसाच्या प्रमेयाविषयी बोलत आहे. हे प्रमेय सांगते की, चौरसाच्या कर्णाची लांबी, जर बाजूच्या पटीत मोजली तर, $\sqrt{२}$ च्या पटीत असते व ही $\sqrt{२}$ संख्या काही पूर्णांक नाही. (इतकेच काय पण ती गुणोत्तरीय संख्याही नाही.)

एका अर्थाने, वैज्ञानिक संकल्पना अस्वाभाविक असतात हे म्हणणे ही चक्रापत्तीच आहे. कारण वैज्ञानिक संकल्पना जर स्वाभाविक असत्या तर त्या सुचण्यासाठी विज्ञानाची अवघड आणि चेंगट तंत्रे वापरावीच लागली नसती. आतापर्यंत आपण जी उदाहरणे पाहिली त्यात गुंफलेली वैज्ञानिक तत्त्वे त्यामानाने समजायला सुलभ अशीच होती. पण आपण जर विश्वविज्ञान (कॉस्मॉलॉजी) या विषयाचा विचार करू लागलो, कृष्णविवरे आणि विश्वाचा जनक असणारा महास्फोट यांच्या गुंत्यात अडकलो, लाखो-कोट्यवधी-अब्जावधी वर्षांपूर्वी हे विश्व केवळ काही मिनिटात अवतरले अशा कल्पनांशी खेळू लागलो तर, विज्ञानाची विचारसरणी सामान्य समजुतीच्या केवळ विरोधातच आहे असे नाही तर ज्यांनी भौतिकीचे शिक्षण घेतलेले नाही त्यांना समजण्याच्या पलीकडची किंबहुना अतर्क्य आहे असे वाटू लागते. अणूहूनही सूक्ष्म अशा कणांचा विचार करणाऱ्या विज्ञानात ज्या संकल्पनांचा वापर होतो त्यांचा तर रोजच्या अनुभवांशी कोणताच मेळ बसत नाही.










अणूहून सूक्ष्म अशा कणांची जी सृष्टी आहे तीत विद्युतभारित सूक्ष्म कण जे इलेक्ट्रॉन त्यांचा वावर असतो. विश्वात जे द्रव्य (मॅटर) आहे ते बहुतेक या इलेक्ट्रॉनचे बनले आहे. एक इलेक्ट्रॉन हुबेहूब दुसऱ्यासारखा असतो. या इलेक्ट्रॉन्सच्या हालचालींबद्दल हायझेनबर्ग या शास्त्रज्ञाने 'अनिश्चिततेचे तत्त्व' मांडले आहे. हे तत्त्व असे सांगते की, ज्या कणांचा अणू बनतो, तो कण कोणत्या वेळी कोणत्या ठिकाणी असेल हे नेमके सांगायला गेलो तर आपणाला त्या कणाच्या वेगाविषयी निश्चितपणाने काही सांगता येत नाही. कणाचा फिरण्याचा वेग किंवा त्याचे स्थान या पैकी एकाच गोष्टीविषयी आपल्याला निश्चितपणाने माहिती मिळू शकते.

अणूहून सूक्ष्म अशा कणांच्या जगातील हालचाली या पुंज यांत्रिकी (क्वांटम मेकॅनिक्स) नियमानुसार होतात. पुंज यांत्रिकीमध्ये आपल्या अनुभवातील कार्यकारण भावाचा अंमल चालत नाही व किरणोत्सर्गी पदार्थांच्या क्षयासारख्या कित्येक घटनांविषयी निश्चित अंदाज वर्तविता येत नाहीत. आईन्स्टाईनला देखील या गोष्टी विचित्र वाटल्या. 'ईश्वर फाशांनी खेळत नाही', हे त्याचे प्रसिद्ध वाक्य पुंजयांत्रिकीमधील कार्यकारण-भावाची अनुपस्थिती व यदृच्छेला (चान्स) दिलेली प्रमुख भूमिका यांना उद्देशूनच म्हटलेले होते.

भौतिकीचा विषय झालेली जडसृष्टी आणि जीवशास्त्राचा विषय असणारी सचेतनसृष्टी या दोन्हीच्याही वेधक वर्णनासाठी गणिताची निष्कृष्ट (ॲब्स्ट्रॅक्ट) भाषा उपयोगी पडावी हा देखील विज्ञानाचा एक विचित्र पैलू आहे. गणिती भाषा सृष्टीतील विविध घटकांना चपखलपणे का लागू पडते हा प्रश्न गहन आहे. त्याचे उत्तर काही असो, पण ही गोष्ट आश्चर्यकारक आहे खरी.

विज्ञान हे गणिताने ओतप्रोत भरलेले असल्यामुळे वैज्ञानिक संकल्पना साध्या भाषेत मांडणे फार अवघड जाते. दुसरे असे की विज्ञानाचे आकलन टप्प्या-टप्प्याने करून घ्यावे लागते. मूलभूत संकल्पनांवर प्रभुत्व मिळविल्याखेरीज अधिक वरच्या पातळीवरील संकल्पना समजून घेणे शक्य नाही. भौतिकीमध्ये तर गणिताचे कार्य सूत्रधाराचे आहे. त्यामुळे भौतिकीमधील संकल्पना रोजच्या भाषेत व्यक्त करणे फार अवघड आहे. कित्येक संकल्पना तर केवळ गणिताच्या भाषेतच मांडता येतात; गोचर वस्तूच्या रूपात या संकल्पनांची अभिव्यक्ती होऊच शकत नाही. या अडचणीमुळेच पुंजयांत्रिकी, कृष्णविवरे आणि इतर संकल्पना सामान्य मनुष्याच्या डोक्यावरून जातात. हीच गोष्ट रसायनशास्त्राच्या बाबतीतही सांगता येईल. अणूंमधील संबंध दाखविणारी रसायनशास्त्रातील सूत्रे नेहमीच्या भाषेत व्यक्त करणे अशक्य आहे. उदाहरण द्यायचे तर कोलेस्टेरॉलचे सूत्र रसायनशास्त्र जो शिकलेला नाही, त्याला समजणे अशक्य आहे.

रेणवीय जीवशास्त्रातील (मोलेक्युलर बायोलॉजी) संकल्पना देखील भौतिकीतील संकल्पनांइतक्याच सहज समजुतीला न पटणाऱ्या आहेत. विज्ञानाची माहिती देताना, इथून पुढे या रेणवीय जीवशास्त्रीय संकल्पनांची उदाहरणे द्यावी लागणार आहेत. म्हणून यातील काही संकल्पनांचे अधिक वर्णन करू.

डी.एन.ए. हे पैतृक द्रव्य असून त्यातून आनुवंशिक गुण एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे दिले जातात हे आपल्याला माहीत आहे. डी.एन.ए. चे कार्य ही विज्ञानातील अशी मूलभूत कल्पना आहे की, जी सहज समजावून सांगता येईल. त्यासाठी गणिताची जरूरी पडत नाही. परंतु, अधिक खोल विचार केला तर ही कल्पना किती जटिल आहे व त्याची पृष्ठभूमी किती तांत्रिक (टेक्निकल) आहे, हे लक्षात येते. पैतृक द्रव्य म्हणून काही दाखवता येईल, असा अंदाज बांधण्यासाठी सुद्धा बऱ्याच वैज्ञानिकांनी खूप कष्ट घेतले. मुले आईबापांसारखी दिसतात, जनावरांची पिल्ले देखील त्यांच्या आई-वडिलांसारखी असतात हे जरी जुन्या काळापासून माहीत होते तरी कशाच्या योगाने हे साम्य निर्माण होते हे विसाव्या शतकापर्यंत शास्त्रज्ञांना कळले नव्हते. ॲरिस्टॉटलच्या काळापासून आनुवंशिकतेचा खुलासा करणारे सिद्धान्त सांगण्यात आले. या सिद्धान्तात तीन कल्पना मध्यवर्ती असत : एक, आनुवंशिकता ही 'न्यूमा' नावाच्या द्रव्यशून्य तत्त्वाच्या विद्यमाने निर्माण होते; दोन, आनुवंशिकतेत वडिलांकडून होणारे योगदान हेच केवळ महत्त्वाचे असते; तीन, मुलाची शरीररचना विशिष्ट तऱ्हेची होण्यासाठी माता-पिता ज्या परिसरात राहात असतात तो परिसरही कारणीभूत असतो. १९व्या शतकाच्या अखेरीस हे स्पष्ट झाले की, 'क्रोमोसोम्स' हा आनुवंशिकतेचा आधार आहे. क्रोमोसोम हे दोऱ्यासारखे द्रव्य असून ते पेशीच्या केंद्रात असते. १८७० सालानंतर असे कळून आले की, नराकडून येणारे पैतृक द्रव्य ज्या अंड्याद्वारे येते ते अंडे शुक्राणूंपासून तयार होते. तोपर्यंत हे शुक्राणू म्हणजे मनुष्याच्या शरीरात पाहुणे आलेले जंतू आहेत, अशी समजूत होती. हे सर्व शोध लागण्यासाठी काही विलक्षण प्रयोग करावे लागले, काळजीपूर्वक

निरीक्षणे घ्यावी लागली. सूक्ष्मदर्शक यंत्रात मोठी प्रगती झाल्याने हे शक्य झाले. जगाच्या दैनंदिन अनुभवाच्या आधारावर आपण विसंबलो असतो, तर हे शोध लागले नसते.

डी.एन.ए. हेच पैतृकद्रव्य (जेनेटिक मटीरियल) आहे आणि हे द्रव्य पेशींची हालचाल नियंत्रित करते हे ध्यानात येण्यासाठी इतर अनेक प्रयोग करावे लागले व इतर अनेक शोध घ्यावे लागले. हे प्रयोग काही केवळ जीवशास्त्रीयच होते असे नाही. त्यासाठी फार गुंतागुंतीच्या भौतिकी व रसायनशास्त्रीय सिद्धान्ताचा उपयोग करावा लागला. डी.एन.ए.ची रासायनिक घटना काय आहे, हे रसायन तज्ज्ञांनी बऱ्याच आधी सांगितले होते. डी.एन.ए. चार सूक्ष्म द्रव्यांचे बनलेले असते, हे ठाऊक होते. पण १९५३ साली डी.एन.ए. ची रचना (स्ट्रक्चर) काय आहे - म्हणजे ही सूक्ष्मद्रव्ये कशा पद्धतीने रचलेली असतात - हे कळल्यानंतर या शोधमार्गाला नवीन दिशा मिळाली. एखाद्या रेणूमध्ये (मोलेक्यूल) अणू कसे बसले आहेत - आणि अणूंची व्यवस्था केवळ एका रेषेत किंवा एका प्रतलातच असते असे नाही तर त्यांचा त्रिमिती पुंजही असू शकतो - हे कळण्यासाठी भौतिकी आणि रसायन या शास्त्रांचे अभ्यासक क्ष-किरणांचे निवर्तन (एक्स-रे डिफ्रॅक्शन) नावाचे तंत्र वापरतात. ज्या द्रव्यातील अणु-रचना तपासावयाची असेल त्या द्रव्याच्या स्फटिकावर क्ष-किरणांचा झोत टाकतात. स्फटिकातून आरपार गेलेले किरण फोटोग्राफिक प्लेटवर पडून त्या प्लेटवर काही ठिपके उमटतात. या ठिपक्यांनी बनलेली आकृती गुंतागुंतीची असली तरी तीवरून सदर स्फटिकात अणूंची कशी गोठवण झाली आहे, ते कळते. स्फटिकातून जाताना क्ष-किरण कसे व किती विचलित झाले ते फोटो-प्लेटवरील ठिपक्यातून कळते. यासाठी केवळ कौशल्यच लागते असे नाही तर गणिती खुब्या व कसरती वापराव्या लागतात.

जेम्स वॅटसन व फ्रान्सिस क्रिक यांनी डी.एन.ए.ची घडण उकलून दाखवली तेव्हा त्यांना डी.एन.ए.चे रासायनिक गुणधर्म आणि क्ष-किरण-विवर्तन या दोन्हींचा अभ्यास करावा लागला. पूर्व-माहितीचा भरपूर साठा आणि असीम कष्ट यांच्या जोरावरच डी.एन.ए. ची घडण त्यांना शोधून काढता आली. या घडणीच्या विश्लेषणातून सुखद आश्चर्य वाटावे अशी गोष्ट कळली. सजीवांच्या जाती पडतात कारण अपत्य ही माता-पित्यांची आवृत्ती (रेप्लिका) असते. या आवृत्ती होण्याचे रहस्य डी.एन.ए.च्या घडणीचा अभ्यास करता समजून आले. डी.एन.ए. हा एक लांब दोऱ्यासारखा रेणू असून या दोऱ्यात दोन धागे असतात. हे धागे एकमेकांभोवती गुंडाळलेले असल्याने प्रत्येक धाग्याला मळसूत्राचा आकार आलेला असतो. त्यामुळे एकूण डी.एन.ए.ची रचना जोडमळसूत्राची (डबल हेलिक्स) आहे असे म्हणतात. डी.एन.ए.तील प्रत्येक धागा हा वर सांगितलेल्या चार सूक्ष्म द्रव्यांचा बनलेला असतोच पण प्रत्येक धाग्यातील या सूक्ष्मद्रव्यांची जी व्यवस्थिती (ॲरेंजमेंट) असते तिची दोन लक्षणीय वैशिष्ट्ये असतात. पहिले वैशिष्ट्य असे की, प्रत्येक व्यक्तीच्या डी.एन.ए. मध्ये दोन्ही धाग्यातील या चार द्रव्यांची व्यवस्थिती असाधारण (युनिक) असते. ज्या क्रमाने ही चार द्रव्ये धाग्यात लावलेली असतात त्या क्रमावरून डी.एन.ए.चे गुणधर्म ठरतात. दुसरे, एका धाग्यातील सूक्ष्मद्रव्यांची क्रमवारी व दुसऱ्या धाग्यातील सूक्ष्मद्रव्यांची क्रमवारी यांच्यातील संबंधातही एक असाधारणत्व (युनिकनेस) आणि परस्पर-पूरकत्व (कॉम्प्लिमेंटॅरिटी) असते. म्हणजे असे की, 'अ' या धाग्यातील 'द', हे सूक्ष्मद्रव्य 'ब' या धाग्यातील 'ध' या सूक्ष्मद्रव्याशीच, धागे जेव्हा एकमेकांभोवती गुंडाळेले असतात तेव्हा, पूरक म्हणून राहिलेले असते. त्यामुळे एका धाग्यातील सूक्ष्मद्रव्यांची क्रमवारी कळली की, दुसऱ्या धाग्यातील क्रमवारी आपसूकच ठरते. यातून आवृत्ती होण्यामागची यंत्रणा समजून येते. दोन धाग्यांचा गुंता सुटतो व धागे निराळे होतात. नंतर (ज्यात हे धागे असतात ती) पेशी सुटी असणारी सूक्ष्मद्रव्ये घेते. (अशी सुटी, धाग्यात न गुंफलेली सूक्ष्म द्रव्ये हजर असतातच.) ती पेशी प्रत्येक धाग्याला पूरक असे धागे तयार करून मूळ धागा व नवा केलेला धागा यांचे जोड मळसूत्र बनवते. अशा रीतीने मूळच्या एका डी.एन.ए. रेणूचे, हुबेहूब तसेच, दोन नवे डी.एन.ए. रेणू तयार होतात. आवृत्तीकरणाची ही जी यंत्रणा पेशीत असते त्यातून सजीवांच्या आवृत्ती तयार होण्याची प्रक्रिया समजून येते. मात्र हे, वर दिलेले वर्णन, बरेच सरधोपट आहे. हे सगळे होताना ज्या गुंतागुंतीच्या रासायनिक क्रिया घडून येतात, त्यांचा काहीच विचार येथे आलेला नाही. प्रत्येक धाग्यातील सूक्ष्म द्रव्यांची क्रमवारी सुनिश्चित असल्याने डी.एन.ए.ची नवी आवृत्ती करणे शक्य होतेच; पण, या क्रमवारीमुळे पैतृक द्रव्य असणाऱ्या डी.एन.ए.ला पेशीच्या वर्तणुकीवर नियंत्रणही ठेवता येते. पेशीचे वर्तन पेशीमध्ये प्रथिने (प्रोटीन्स) म्हणून ओळखले जाणारे रेणू (मोलेक्यूल्स) असतात त्यांच्या योगाने निश्चित होते. एकेका पेशीत हजारो






प्रकारांची प्रथिने असतात. पेशीत ज्या रासायनिक क्रिया घडतात त्यांचे कारण ही प्रथिनेच असतात. खेरीज, स्नायूंचे आकुंचन ज्या वाद्यांच्या (फिलॅमेन्ट्स्) सहाय्याने शक्य होते त्या वाद्या बनण्यासाठी पेशींची गुंफण व्हावी लागते. ती गुंफण देखील प्रथिनांमुळेच शक्य होते. प्रत्येक पेशीची प्रकृती (कॅरॅक्टर) पेशीमध्ये कोणत्या प्रकारची प्रथिने आहेत अथवा नाहीत यावरून ठरते. त्यामुळे पेशीचे वर्तन नियंत्रणात ठेवायचे असेल तर प्रथिनांचे नियमन केले पाहिजे.

डी.एन.ए.च्या रचनेत एक संकेत (कोड) गुंफलेला असतो. त्या संकेतामुळे डी.एन.ए.ला पेशीतील प्रथिनांवर काबू ठेवता येतो. प्रथिन हे ॲमिनो ॲसिडस्चे बनलेले असते. आपण पाहिलेच आहे की, डी.एन.ए. मध्ये चार सूक्ष्मद्रव्ये क्रमवारीने (प्रत्येक धाग्यात) लावलेली असतात. ह्या क्रमवारीची मोडणी अशीही करता येते की, त्यामुळे प्रत्येक मोडणीत वीस ॲमिनो ॲसिडस् क्रमवारीने लावलेली दिसून येतात; अशी ही वीस ॲमिनो ॲसिडस्ची क्रमवारी म्हणजे एक प्रथिन. प्रत्येक प्रथिनांचे गुणधर्म त्यातील वीस ॲमिनो ॲसिडस्च्या क्रमवारीवर ठरतात. थोडक्यात, पेशीतील डी.एन.ए. हे (त्या पेशीतील) प्रत्येक प्रथिनाची घडण सांगणारे पुस्तकच आहे, असे म्हणता येईल. प्रत्येक पेशीचे आयुष्य, त्याचा स्वभाव हा डी.एन.ए. मधील प्रथिने कशी 'वाचली' जातात त्यावरून ठरतो.

(डी.एन.ए.) ही जी सार्वत्रिक आणि कौशल्यपूर्ण यंत्रणा आहे ती जीवनाच्या मुळाशी आहे. जीवशास्त्र, आनुवंशिकीशास्त्र, पेशीजीवशास्त्र (सेल बायॉलॉजी), विकास आणि उत्क्रांती या सर्व गोष्टी या यंत्रणेवर आधारलेल्या आहेत. आधुनिक पेशीजीवशास्त्र आणि रेणूजीवशास्त्र यातील संकल्पनांची चाहूल देखील आपल्याला दैनिक व्यवहारातून मिळण्याजोगी नाही. आणखी दोन गोष्टी अशा आहेत की, ज्यांच्या बाबतीत सहज समजूत (कॉमनसेन्स) हात टेकते. एक, एका पिढीने प्राप्त करून घेतलेले (ॲक्वायर्ड) स्वभाव (कॅरॅक्टर्स) हे आनुवंशिकतेने पुढील पिढीकडे का जात नाहीत आणि दोन, उत्क्रांतीमुळे होणारे बदल हे सर्वस्वी डी.एन.ए. मध्ये होणाऱ्या बदलांवर का अवलंबून असतात. हे जे प्रश्न आहेत ते परस्परांशी निगडित आहेत. आई-वडिलांकडून मुलाकडे शुक्रजंतू आणि अंडे यांच्या द्वारे जे गुणधर्म संक्रांत होतात ते, काही अपवाद वगळता, डी.एन.ए. करवी वाहून नेलेले असतात. एखाद्या जीवाच्या गुणधर्मात झालेला बदल पुढच्या पिढीकडे आनुवंशिकतेने जायचा असेल तर तो फक्त डी.एन.ए. मध्ये बदल घडवूनच संक्रांत होऊ शकतो. डी.एन.ए. मध्ये हा बदल कशामुळे होतो? एकतर आई कडून आलेल्या डी.एन.ए. मधील सूक्ष्म द्रव्यांची क्रमवारी व वडिलांकडून आलेल्या डी.एन.ए. मधील सूक्ष्म द्रव्यांची क्रमवारी यातील तफावतीमुळे अपत्याच्या डी.एन.ए. मध्ये बदल होतो; किंवा परिसरातील बदलामुळे डी.एन.ए. ला धक्का पोचून सूक्ष्म द्रव्यांची क्रमवारी बदलू शकले. कधी कधी डी.एन.ए.ची आवृत्ती काढताना चूक होते. कारण काही असो, डी.एन.ए. मध्ये बदल झाला की, पेशीमधील प्रथिनांचा जो मेळ बसलेला असतो, त्यातही फरक पडतो. उत्क्रान्ती ही, अशा तऱ्हेने, डी.एन.ए. मध्ये एका पिढी कडून दुसऱ्या पिढीकडे डी.एन.ए.ची देवाण होताना जे बदल होतात त्यामुळे घडून येते. अगदी प्राथमिक दर्जाची पेशी व प्रगत असा प्राणी यांच्यात तफावत असेल तर ती हीच की, पेशीतील डी.एन.ए. व प्राण्याच्या पेशीतील डी.एन.ए. यांच्यातील सूक्ष्म द्रव्यांच्या क्रमवारीत फरक असतो. पुढचे असे की, डी.एन.ए. तील बदलाला सुरुवात होते ती केवळ योगायोगाने. प्राण्याची वर्तणूक, त्याला आलेले अनुभव यांच्यामुळे डी.एन.ए.त अमुक प्रकारचा बदल घडवून आणू आणि त्या बदलामुळे त्या प्राण्याने प्राप्त करून घेतलेला स्वभाव विशेष – सामर्थ्य, ज्ञान, भय, प्रेम इ. – पुढच्या पिढीकडे संक्रांत होईल, असे काही सांगता येत नाही. अशा या योगायोगाने घडणाऱ्या बदलांच्या प्रक्रियेतून मनुष्यप्राणी घडवला गेला ही गोष्ट जीवशास्त्रज्ञांना देखील अचंबा वाटावा अशी आहे. कोणाला असे वाटण्याचा संभव आहे की, या गोष्टीमागे कोणा अज्ञात शक्तीने केलेले नियोजन आहे; पण योगायोगाच्या कल्पनेला पूरक असा पुरावा भरपूर आहे. हे खरे आहे की, हा साराच विषय जाणून घ्यायला खूप वर्षे जावी लागतील व नंतरच याविषयी काही निर्णय करता येईल.

स्किनर नावाचा एक मानसशास्त्रज्ञ आहे. तो वर्तनाचा (बिहेवियर) अभ्यास करतो. तो म्हणतो की, "विज्ञानपूर्व काळात मनुष्याने काही योग्य निर्णय घेतले किंवा त्याची सामान्य समजूत (कॉमन सेन्स) शहाणपणाने वापरली किंवा त्याला आयुष्यात जे अनुभव आले त्यातून गवसलेल्या युक्त्यांचे (इनसाईट्स) त्याने अवलंबन केले (व त्यामुळे मनुष्य उत्क्रान्त झाला) इ. कयास बांधायला आपल्यापाशी काय पुरावा आहे? पुरावा केवळ आज उपलब्ध असलेले विज्ञान हाच होय.'









मला तर असा दावा करावासा वाटतो की, जर एखादा निष्कर्ष सामान्य समजुतीला पटणारा असेल तर तो हमखास अ-वैज्ञानिक निष्कर्ष आहे, असे समजावे. याला कारण आहे की, सृष्टीचे कार्य जे चालते ते सामान्य समजुतीला धरून चालत नाही. दोन्हीत काहीच साधर्म्य नाही. आपला मेंदू आणि त्यामुळे आपली वर्तणूक यांना उत्क्रांतीच्या काळात अवलंबिलेल्या निवडपद्धतीमुळे असा घाट आला आहे की, आपल्या अगदी निकट चाललेल्या सृष्टीच्या व्यापाराचाच आपण विचार करू शकतो. आपल्या जवळच्या घडामोडींवर ज्यांच्या योगाने नियंत्रण मिळवता येईल अशा प्रकारचे, सोपे किंवा अवघड तंत्रविज्ञान ज्याने लाभू शकेल तितकाच विचार करण्याची आपल्याला सवय लागली आहे. सृष्टीचे वैज्ञानिक आकलन हे मुळातच अस्वाभाविक आहे कारण मनुष्याच्या उत्क्रांतीला वैज्ञानिक विचाराची गरजच नाही. गरज आहे ती नजिकच्या घडामोडींवर अंमल मिळवण्याची व त्यासाठी जे तंत्रज्ञान आत्मसात व्हावे लागते त्याला विज्ञानाची आवश्यकता नाही.

विज्ञानाची ही जी अस्वाभाविकता आहे त्यामुळेच इतिहासात विज्ञानाचा आढळ विरळा होतो. मनुष्याच्या वागण्यात त्याचा विचार व त्याचा अभ्यास ही अनुस्यूत असतात खरी, पण मनुष्याला त्याचे भान नसते. परंतु विज्ञानात मात्र नवीन निर्णय घेताना, विचार व अभ्यास (लर्निंग) यांचा जाणीवपूर्वक उपयोग करावा लागतो. आपण सायकल चालवतो. त्याचे विज्ञान मांडावयाचे ठरवले तर ते खूप गुंतागुंतीचे असेल; पण त्याची मुळीच जाणीव नसूनही आपण सहजपणे सायकल चालवतो. पॅसिफिक महासागरातील बेटात आदिवासी जमाती आहेत. ते लोक दूर-दूरच्या बेटांवर होड्यात बसून जातात. होडीत असताना ते असे धरून चालतात की, होडी चालत नसून बेटच होडीपासून दूर जात आहे (किंवा दुसरे बेट जवळ येत आहे); आकाशातील तारे मागे सरकत आहेत इ. अशा तऱ्हेचे नौकानयन कशामुळे कामी येते? हा केवळ सवय किंवा अभ्यास यांचा परिणाम आहे. इथे आकलनाचा काही संबंध नाही. यातून हे ठळकपणे समजून येते की, मनुष्य नाना अडचणींना केवळ सवयीमुळे व आकलन न होता, तोंड देऊन वेळ निभावून नेऊ शकतो. अभ्यास किंवा सवय ही या बाबतीत आकलनापेक्षा महत्त्वाची आहेत.

विज्ञानाची विचारशैली ही अस्वाभाविक आहे तर सामान्य समजूत ही स्वाभाविक आहे. सामान्य समजुतीचा उपयोग करताना ज्या मानसिक क्रिया घडून येतात त्या अतिशय गुंतागुंतीच्या असतात व त्या क्रियांचे भानही आपणास नसते. पण दैनंदिन जीवनातील प्रश्नांचा निर्वाह मात्र त्यामुळे होतो. रोजच्या राहाटीला सामान्य समजुतीने आपण तोंड देऊ शकतो. पण विज्ञानाच्या दृष्टीने (रोजचे व्यवहार उरकण्याची ही पद्धत) अगदी असमाधानकारक आहे. विज्ञानात सुसंगती, वस्तुनिष्ठा, काटेकोरपणा यांना फार महत्त्व आहे व सामान्य समजुतीत त्यांचे प्रमाण फार कमी आहे. बहुतेक लोकांना त्यांच्या सृष्टीविषयीच्या ज्या कल्पना असतात त्या खऱ्या आहेत, असे त्या कल्पना ज्या पुराव्यावर आधारलेल्या आहेत त्याची तपासणी न करताच वाटते. उलट विज्ञानात पुराव्याची जाणीवपूर्वक छाननी करावी लागते. जेव्हा प्रश्न आकारिक (फॉर्मल) स्वरूपात मांडला जातो किंवा जिथे माहिती अपुरी असते तेव्हा सामान्य समजुतीला धरून होणारा विचार यशस्वी ठरत नाही. सामान्य समजुतीला धरून असणारी विचारशैली ही मुळी आकारिक स्वरूपातील प्रश्नांचा किंवा सार्वत्रिक उत्तरे शोधण्याचा उद्देश धरून घडवलेलीच नाही. लहान मुले कसा विचार करतात आणि प्रौढ माणसे कसा विचार करतात आतील फरक तपासला तर सामान्य समजुतीच्या आधाराने चाललेला विचार आणि वैज्ञानिक विचार यातील फरक लक्षात येईल.

पूर्वी अशी समजूत होती की, आपल्या अनुभवाला जे जग येते त्याची काही व्यवस्था आहे (स्ट्रक्चर) याची लहान मुलाला असणारी जाणीव फार तोकडी असते. पण आता हे मत बदलले आहे. दोन वर्षाच्या मुलाला देखील कार्य-कारण-भावाची जाणीव असते. एखादे भांडे फुटल्यास ते मूल "हे कोणी फोडले?" असे विचारते. मुलाना हेही समजते की, वस्तू व तिचे चिन्ह (उदा. शब्द) या वेगळ्या गोष्टी आहेत. तसेच रंग व आकार यांच्या आधाराने मुले वस्तूंची वर्गवारी करू शकतात. चौथ्या वर्षी मुलाना कळू लागते की, वस्तूच्या रूपावरून (ॲपिअरन्स) त्या वस्तूची खरी ओळख पटतेच असे नाही. (अंड्याच्या आकाराच्या व रंगाच्या दगडाचे ऑम्लेट करता येत नाही.) ढोबळपणे म्हणायचे तर प्रत्यक्ष अनुभव, जाणकारांची शिकवण, अंतःप्रज्ञा व तर्कशास्त्र यांच्या सहाय्याने मुले शिकतात. या सर्वातून जगाविषयीची सामान्य समजूत तयार होते; पण वैज्ञानिक दृष्टी तयार होत नाही.

जिआं पियागे हा एक स्वित्झर्लंड मधला मानसशास्त्रज्ञ आहे. तो सांगतो की, अगदी लहानपणी प्रत्येक मुलाला वाटते

जग हे उत्स्फूर्त (स्पाँटेनियस) हालचाली आणि चैतन्यमय शक्ती (फोर्स) यांनी भरलेले आहे. लाटा स्वतःहून उचंबळतात, ढग फुंकर मारून वाऱ्याचे झोत निर्माण करतात आणि या हालचाली अंतस्थ आणि बहिस्थ अशा क्रियांमुळे (ॲक्शन्स) घडून येतात. सर्व पदार्थांना त्यांची प्रत्येकाची इच्छाशक्ती असते. नद्यांना समुद्राकडे जाण्याची ओढ असते व समुद्रही त्यांना ओढून घेत असतो. मुले थोडी मोठी झाली की, अनेक घडामोडींचा त्यांनी केलेला खुलासा व ॲरिस्टॉटलने मांडलेली भौतिकी (फिजिक्स) यात मोठे साम्य दिसून येते. उदा. ॲरिस्टॉटल असे मानत असे की, दगड फेकला तर तो हवेच्या ढकलण्यामुळे वर वर जातो व मुलांनाही तसेच वाटते.

अशा रीतीने मुलांच्या विचारात जी सृष्टी असते तिला जादूची झालर असते. याला काहीसे कारण असे असू शकते की, मूल आपण स्वतः व भोवतालचे जग यात फरक करू शकत नाही. काय असेल ते असो, पण मुलांना असे वाटते की, आपल्या मानसिक क्रियांमुळे हव्या असणाऱ्या गोष्टी घडवून आणता येतात किंवा भयप्रद गोष्टी टाळता येतात. एडमंड गॉस नावाचा एक लेखक व समीक्षक होता. व्हिक्टोरियन वातावरणात तो लहानाचा मोठा झाला. त्या वातावरणात कल्पनेत रममाण होण्याला पूर्ण मज्जाव होता. त्याला कधी कोणी गोष्टी सांगितल्या नाहीत. त्याला मित्र नव्हते. त्याच्या वाचनात फक्त भक्तिपर किंवा वैज्ञानिक पुस्तके येत. असे असूनही तो पाचसहा वर्षांचा असताना, तो सांगतो की, "मी विचित्र श्रद्धांच्या आहारी गेलो. मला असे वाटू लागले की, अशा मंत्रांचा मला शोध लागला किंवा असे काही 'छू मंतर' मी माझ्या वडिलांच्या संग्रहात असणाऱ्या पुस्तकातील पशुपक्ष्यांच्या चित्रांना करू शकलो, तर ते पशू जिवंत होतील व पक्षी पुस्तकातून उडून जातील! सकाळी व संध्याकाळी प्रार्थना करताना माझी कल्पना जोरावर येऊन मला वाटे की, मला फक्त किल्ली सापडली पाहिजे म्हणजे माझ्यातील एक 'मी' उडून वळचणीला जाऊन बसेल व तेथून इथेच उरलेला दुसरा 'मी' व इतर माणसे यांच्याकडे पाहात राहील."

मुलांची जगाविषयी जी धारणा असते तिच्यात दोन मुख्य भाग असतात, असे पियागे सांगतो. पहिला भाग म्हणजे जडप्राणवाद (ॲनिमिझम). प्रत्येक वस्तू सजीव आहे व तिच्या ठिकाणी इच्छाशक्ती (विल) आहे, असे मुलाला वाटते. दुसरा भाग म्हणजे कृत्रिमवाद (आर्टिफीशियालिझम). मुलाना असे वाटते की, प्रत्येक गोष्ट कुणीतरी काही विशिष्ट उद्देशाने तयार केली आहे. सहा वर्षांच्या मुलाला तुम्ही विचारा, 'सूर्य कशाचा केला आहे?' उत्तर येईल, "विस्तवाचा". "पण कसा केला?" तो म्हणेल, "उंचावर विस्तव आहे". "पण विस्तव येतो कुठून?" "आकाशातून". "आकाशात विस्तव आला कोठून". "काडीने पेटवला..." मुलाच्या ठिकाणी जडप्राणवाद मानण्याची स्वाभाविक वृत्ती असते. सृष्टीतील घडामोड काही उद्दिष्टाला धरून होत असते, आणि तिचे यदृच्छेला (चान्स) अवकाश नाही, असे मुलाला वाटते. चालताना सूर्य आपल्या बरोबर चालतो, असे मूल म्हणते; कारण, सूर्याचा काही उद्देश आहे, असे त्याला वाटत असते. मुलाला विचारा की, "चमचा म्हणजे काय?", मूल म्हणेल, "चमचा खाण्याकरता असतो". हे कृत्रिमवादाचे उदाहरण आहे.

कार्य-कारण-वाद ही सामान्य समजुतीतील मध्यवर्ती कल्पना आहे. तीन वर्षांच्या मुलांना देखील यांत्रिक हालचालीतील कार्यकारणभाग समजतो. सहा महिन्याच्या मुलाला देखील 'अ' या घटनेचे 'ब' हे कारण आहे, हे कळते. १८ व्या शतकात डेव्हिड ह्यूम नावाचा विचारवंत होता. त्याचा दावा होता की, 'ब' नंतर 'अ' अशा तऱ्हेची जोडी वारंवार पाहिल्याने आपल्याला कार्यकारणभावाचे ज्ञान होते. पण आता, पुराव्याने, असे आढळले आहे की, कार्यकारणभावाचे एकाएकी व संपूर्ण आकलन मनुष्याला होते; त्याच्यासाठी अनुभवाची जरूरी नाही. एखाद्या मोठ्या मनुष्याला काही विशिष्ट क्रमाने रंगीत दिवे दाखवले तर त्या मनुष्याला, रंगीत दिव्यांची क्रमवारी कशीही बदलता येते व बदलली जाईल हे माहीत असून सुद्धा, 'अमुक रंगा नंतर अमुक रंग' असा अडाखा बांधावासा वाटतो. त्यामुळे पुनः पुनः येणाऱ्या अनुभवामुळे कार्यकारणभावाचे आकलन होते असे नसून, मनुष्याच्या इंद्रियानाच कार्यकारणभाव पहाण्याचे वळण पडलेले आहे, असे म्हणावे लागते. विख्यात तत्त्ववेत्ता कांट याचे म्हणणे या पुराव्याने खरे ठरते. अभ्यासाच्या इतर प्रक्रियांच्या बाबतीतही असेच होत असेल, तर सामान्य-समजुतीतून जी शिकवण मिळते ती, मोठ्या प्रमाणात, सोडून द्यावी लागेल.

मुलांना प्रत्येक गोष्ट करताना क्षमतेच्या निरनिराळ्या टप्प्यातून पार व्हावे लागते. परंतु, प्रत्येक टप्प्यावर ती जे काही करतात त्याचे त्यांना स्वतःला पटेल, असे स्पष्टीकरण असते. एका भांड्यातून दुसऱ्या भांड्यात पाणी ओतल्यावर,

भांड्याचा आकार कसाही असला तरी, पाणी तेवढेच राहाते, हे मुलांना कळते की नाही, हे पाहण्यासाठी पियागेने एक प्रयोग केला. प्रथम दोन सारख्या काचपात्रात सारख्याच पातळीपर्यंत पाणी ओतले. नंतर एका चिंचोळ्या पण उंच काचपात्रात एका पात्रातील पाणी ओतल्यावर या नव्या काचपात्रातील पाण्याची पातळी वर गेली. ज्या मुलाला पाण्याची राशी (क्वांटिटी) तेवढीच राहाते, हे माहीत नाही ते सांगते की, ज्या अर्थी पाण्याची पातळी वर गेली आहे, त्या अर्थी पाण्याची राशी वाढली आहे. या उलट ज्या मुलाला राशी बदललेली नाही, हे समजले आहे, ते सांगेल की, नवे काचपात्र चिंचोळे असल्याने पातळीवर गेली आहे. ही परिस्थिती, 'सूर्य पृथ्वीभोवती फिरतो', असे मानणाऱ्या लोकांना त्यांचे मत हे साहजिक बरोबर वाटते, तशा पेकीच आहे.

मुलांना शाळेत विज्ञान शिकवले जाऊ लागते त्या आधीच मुलांच्या जगाविषयीच्या कल्पना चांगल्याच विकसित झालेल्या असतात. यातल्या बऱ्याच कल्पना 'भोळसट' किंवा 'सहजसिद्ध' असतात. याची उदाहरणेही भौतिकीच्या सहाय्याने देता येतील. मुलांना असे वाटते की, वस्तू जेवढी उंच उचलावी तेवढी अधिक जड होते; कारण वस्तू जास्त उंचीवरून पडली तर जमिनीवर जास्त आघात होतो. 'उष्ण' आणि 'थंड' हे निराळे पण संबंधित गुणधर्म समजले जातात. पाण्यात बर्फ टाकला तर बर्फाचे गारपण पाण्याला मिळून पाणी थंड होते, असे मुलांना वाटते. पण भौतिकी सांगते की, पाण्याची उष्णता बर्फाला मिळून बर्फ वितळतो. जीवशास्त्राच्या बाबतीतही तसेच होते. पुष्कळांना वाटते की, वनस्पतींना त्यांचे अन्न सूर्यप्रकाशापासून नव्हे तर जमिनीतून मिळते. (वनस्पतींना नत्रवायू जमिनीतून मिळतो; पण नत्रवायू हे झाडांचे अन्न नाही; कारण, नत्रवायूपासून झाडांना ऊर्जा मिळत नाही.) ही देखील (झाडांना जमिनीतून अन्न मिळते, ही) सहज समजूत आहे पण ती चुकीची आहे.

विद्यार्थी कसा विचार करतात याचा जो अभ्यास झाला आहे, त्यातून एक गोष्ट उघड झाली आहे की, आपल्या विचारातील विसंगती विद्यार्थ्यांच्या ध्यानी येत नाही; आणि आली, तरी तो मोठा दोष आहे, असे त्यांना वाटत नाही. विद्यार्थी जो कार्यकारण-भाव वापरतात त्यात ते एकरेषीय कारण-श्रेणी स्वीकारतात किंवा घटनांची साखळी तरी मांडतात. परंतु, अनेकदा आपल्याला कार्य-कारणांचा व्युत्क्रम कल्पावा लागतो. उदा. पदार्थावर आपण उर्जा सोडली, तर घन पदार्थ वितळतो, हे सहज पटते; पण ऊर्जेच्या योगाने द्रव पदार्थ घनही होऊ शकतो, हे पटायला अवघड जाते. वर उल्लेखिलेल्या अभ्यासातून असे समजून आले आहे की, जड जगताचे नीट आकलन होण्यासाठी मुलांनी काही विशेष विचारक्रिया (रीझनिंग प्रोसेसेस) आत्मसात केल्या पाहिजेत. समजा की, आपल्याला एक तराजू पारड्यात वजने टाकून संतुलित ठेवायचा आहे. या क्रिये मध्ये दोन्ही बाजूची वजने व मधल्या टेकू पासून दोन टोकांची अंतरे अशा चार गोष्टींची जुळवा जुळव करावी लागते. म्हणजे या खटपटीत चार गोष्टी 'चल' (व्हेरिएबल) आहेत. सारांश, तरफांचा (लीव्हर्स) अभ्यास करण्यापूर्वी 'चल' ही कल्पना समजावून दिली पाहिजे. हीच गोष्ट 'संभाव्यता' (प्रोबेबिलिटी) व 'सह-अन्वयता' (कोरिलेशन) या संकल्पनांची. सूर्यमाला किंवा हवामान या गोष्टींचा अभ्यास करायचा तर प्रारूप (मॉडेल) ही संकल्पना मुलांना माहीत हवी. यातल्या कोणत्याच संकल्पना सहज-सुलभ नाहीत. पण असे दिसून आले आहे की, आधी अशा संकल्पनांची ओळख करून देऊन नंतर विद्यार्थ्यांना विज्ञान शिकवले, तर विज्ञानाची परीक्षा ते यशस्वीपणे पार करतात.

अशा प्रकारच्या अभ्यासावरून हे नक्की होते की, वैज्ञानिक विचार आणि देनंदिन पठडीतला विचार यांच्यातील फरक केवळ ज्या संकल्पना या दोन विचार-पद्धती वापरतात, तितक्या पुरता मर्यादित नाही. आविष्कारांचे (फिनॉमेना) कोणते खुलासे ग्राह्य धरावेत या बाबतीतही दोन्हीत विचारभेद आहेत. गतीबाबतचा वैज्ञानिक खुलासा पहा. त्यात शक्ती (फोर्स) व वेग यांच्यातील संबंधांचा विचार होतो. शक्ती व वेग या दोन्ही निश्चित स्वरूपाच्या संकल्पना आहेत आणि अवघड संकल्पना आहेत. उलट, देनंदिन व्यवहारात गतीचा खुलासा मोघम रूपात केला तरी पुरतो. आपण रस्ता ओलांडताना येणाऱ्या वाहनांच्या वेगाचा नक्की आकडा पाहून रस्ता ओलांडत नाही. अनुमान धपक्याने रस्ता ओलांडतो. दुसरा फरक दोन्ही प्रकारच्या खुलाशांमागील हेतूचा आहे. दैनिक व्यवहारात आपण विचार करतो तो त्यापासून समोरच्या निकडीचा प्रश्न सुटतो ना, यासाठी. जसे की, रस्ता ओलांडताना येणाऱ्या वाहनाच्या वेगाचा मोघम अंदाज आपल्याला पुरतो. वैज्ञानिक व्यवहारात आपल्याला निष्कृष्ट (ॲब्स्ट्रॅक्ट) स्वरूपात परिस्थितीचे आकलन व्हायला लागते. खरे तर बहुतेक वैज्ञानिक माहिती व सिद्धान्त



अनुक्रमणिका

दैनिक व्यवहाराला पूर्णपणे निरूपयोगी असतात. न्यूटनचे गतिशास्त्र, पेशी-विज्ञान व डी.एन.ए. किंवा इतर वैज्ञानिक उपपत्ती यांची काहीही माहिती नसली, तरी माणूस सुखाने जगू शकतो. पण हेही खरे आहे की, विज्ञानाने आपले जीवन समृद्ध केले आहे आणि आधुनिक समाज जेव्हा धोरण ठरवतो, तेव्हा वैज्ञानिक माहितीचा उपयोग करून घेऊनच निर्णय घ्यावे लागतात.

मनुष्याच्या दैनंदिन कृत्यांचे अगदी सोपे प्रारूप असे मांडता येईल. कृती करण्यापूर्वी तिच्यापासून काय साधावयाचे हे मनुष्य ठरवतो व त्याप्रमाणे कृतीत बदल करतो. या प्रारूपाचा फायदा असा की, आपल्या वर्तणुकीत सामान्य-समजुतीची काय भूमिका असते, ते त्यामुळे स्पष्ट होते आणि माणूस कोणता हेतू बाळगून घडत गेला आहे, हेही कळते. या प्रारूपाचे वैशिष्ट्य असे की, इथे मनुष्याच्या वागणुकीसाठी विज्ञानाची गरज नाही, हे दिसून येते. प्राथमिक अवस्थेतील माणसाकडे जे तंत्रज्ञान होते, त्यातून अपेक्षित गोष्ट का निर्माण होत असे, हेही समजते. विज्ञानात वापरले जाणारे ज्ञान नेमके, बिनचूक व परिपूर्ण असावे लागते. पण दैनंदिन व्यवहाराचे वर जे सोपे प्रारूप बसवले आहे, त्यातून आपल्याला हे कळून येते की, या व्यवहारासाठी लागणारे ज्ञान मोघम असले तरी पुरते. दैनिक व्यवहारात आपण जे निर्णय घेतो, ते आपल्या आठवणीत जी माहिती असते, तिच्या आधाराने. ह्या माहितीचा स्वभावच असा असतो की, जे नेहमी अनुभवाला येते ते सार्वत्रिक आहे असे समजावयाचे व जे तुरळक आहे किंवा अपवादात्मक आहे त्याचे अवडंबर माजवावयाचे.

वैज्ञानिक सिद्धान्ताच्या योग्यतेत त्या सिद्धान्ताचे क्षेत्र (स्कोप) व त्या सिद्धान्तातील गृहीतकांची कमी संख्या यांचा मोठा वाटा असतो. जितकी कमी गृहीतके व जितके कमी नियमांचे जंजाळ तितक्या प्रमाणात वैज्ञानिक सिद्धान्ताचा स्पष्टपणा (क्लॅरिटी), तार्किक सुसंगती, नेमकेपणा, सिद्धान्ताची पडताळ्याला उतरण्याची क्षमता, त्या सिद्धान्ताला असणाऱ्या आधाराचा सच्चेपणा आणि त्या सिद्धान्ताचे साफल्य या गुणात वाढ होते. दैनंदिन व्यवहारात आपण जे आडाखे बसवतो त्यापैकी फारच थोडे या निकषांवर उतरू शकतात. अशा आडाख्यांपैकी फारच थोडे आडाखे स्पष्ट किंवा आकारिक (फॉर्मल) असतात. त्यांची तर्कसंगतता परीक्षणान्ती टिकत नाही. हे आडाखे बहुतेक वेळी स्पष्टार्थाचा बोध न करणारे असतात. विज्ञानाची प्रक्रिया अशी असते की, तीत काय चालले आहे याचे सतत परीक्षण होत असते. वैज्ञानिक प्रक्रियेचा आत्मपरीक्षण करण्याचा हा जो स्वभाव आहे त्यामुळे वैज्ञानिक क्रिया (ॲक्टिव्हिटी) ही इतर क्रियांपेक्षा निराळी पडते. वैज्ञानिक जेव्हा विज्ञानव्यापारात (डुइंग सायन्स) गढलेला असतो तेव्हा आपण एक अनोखी कृती करीत आहोत, असे भान त्याला असते. हे जे 'भान' आहे त्यामागे अशा अनेक गोष्टी व गृहीतके दडलेली आहेत की जी कधीच उघडपणे मांडली जात नाहीत. या गृहीतकांमुळेच वर सांगितलेली वैज्ञानिक सिद्धान्तांची वैशिष्ट्ये निर्माण होतात.

जे सुलभ आहे त्याचा स्वीकार करायचा व जे गुंतागुंतीचे वाटते ते टाळायचे, अशी वृत्ती, जे लोक सामान्य समजुतीवर विसंबून असतात, त्यांच्या ठिकाणी बळावलेली दिसते. मनुष्याची ही जी वृत्ती आहे तिचा खुलासा उत्क्रांतीच्या आधाराने करता येईल. आदिमानव त्याला पूर्ण प्रतिकूल असणाऱ्या वातावरणात राहात होता. अशा वेळी आपला परिसर जितक्या जलदीने आपण समजावून घेऊन तितके चांगले असे आदिमानवाला, उत्क्रांतीच्या दृष्टिकोणातून आपण आज विचार करतो तेव्हा, वाटले असणार असे दिसते. या खटपटीत त्याला कार्यकारण भाव हे अतिशय उपयोगी साधन गवसले. प्रतिकूल अशा परिसरात राहताना आदिमानवाला त्वरेने आणि तात्काळ निर्णय घ्यावे लागत असणार; साहजिकच मेंदू असा बनत गेला की, घटनांची संभाव्यता आणि आडाख्यांच्या विरोधात जाणाऱ्या घटना यांचा विचार करणे मेंदूला टाळावेसे वाटू लागले. धातूंचा उपयोग व शेती हे असे उद्योग आहेत की, ज्याला वैज्ञानिक विचारांची गरज भासत नाही. परंतु विज्ञानाचा विचार रुजण्यासाठी शास्त्रशुद्ध (रिगरस) विचाराची सवय लावून घ्यावी लागते; आणि 'सामान्य समजूत' या नावाने जे सुलभ विचारांचे घाट ओळखले जातात त्यातून बाहेर यावे लागते.

**

---

टीप : लुईस वोल्पर्ट हे युनिव्हर्सिटी कॉलेज, लंडन इथे प्राध्यापक आहेत. त्यांच्या विषय "औषधासाठी उपयोजित जीवशास्त्र" असा आहे. ते 'रॉयल सोसायटी' या विख्यात विज्ञानसंस्थेचे सभासद (फेलो) आहेत. त्यांनी इंग्लंडमधील आकाशवाणीवर अनेक ख्यातनाम वैज्ञानिकांच्या मुलाखती घेतल्या आहेत व स्वतंत्र भाषणेही केली आहेत. 'दि अन-नॅचरल नेचर ऑफ सायन्स' हे त्यांचे पुस्तक १९९२ साली 'फेबर ॲण्ड फेबर' या प्रकाशनसंस्थेने प्रसिद्ध केले. या पुस्तकातील दुसऱ्या प्रकरणावर वरील लेख आधारलेला आहे.

अनुक्रमणिका








# गोतावळा

## द.तु. पाटील

आनंद यादव यांची 'गोतावळा' कादंबरी १९७१ साली प्रकाशित झाली. ग्रामीण माणसाने आपल्याभोवती निर्माण केलेला पशुपक्ष्यांचा गोतावळा आणि त्यावर बसलेला त्याचा जीव या विषयीचे कादंबरीत आलेले चित्रण मराठी साहित्यात नवीन होते. त्याशिवाय अस्सल ग्रामीण बोलीभाषेतील निवेदन या वेगळेपणामुळे तिने लक्ष वेधून घेतले. आजपर्यंत तिच्यावर अनेकांनी लिहिले आहे. त्यामध्ये वा.ल. कुलकर्णी, प्रभाकर पाध्ये, द.भि. कुलकर्णी, चंद्रकांत बांदिवडेकर यांसारखे मान्यवर समीक्षक आहेत. स्वतः आनंद यादव यांनी या कादंबरी संदर्भात लिहिले आहे. हे सर्व लेखन तिची गुणवत्ता अधोरेखित करणारे आहे. मराठीतील एक अव्वल दर्जाची ग्रामीण कादंबरी म्हणून तिला मान्यता मिळाली आहे.

तिचे ठसठशीत ग्रामीणत्व दाखवून देणाऱ्या विपुल लेखनातून माझ्यासमोर काही प्रश्न उभे राहतात. या प्रश्नांचा ऊहापोह करावा वाटतो आणि ग्रामीण वास्तव समोर ठेवून ही कादंबरी खरोखरच अव्वल दर्जाची ग्रामीण कादंबरी आहे का, या प्रश्नाचे उत्तर पुन्हा एकदा शोधावे वाटते.

'गोतावळा' कादंबरीत रामू सोनवडे नावाच्या जमीनदाराच्या घरी चाकरी करणाऱ्या नारबाच्या चाकरीतील दैनंदिन कामाचे, मालकाच्या गुराढोरात, पशुपक्ष्यात गुंतलेल्या मनाचे चित्रण येते. या कादंबरीचा मुख्य विषय हा यंत्रयुगाने परंपरागत ग्रामीण कृषिसंस्कृतीवर आक्रमण करून तिला उद्ध्वस्त करून टाकले आहे, हा आहे. तिच्यावरील समीक्षात्मक लेखांमधून या विषयावरच जास्त भर दिला आहे. मराठी कादंबरी, ग्रामीण कादंबरी, ग्रामीण साहित्य यांसारख्या विषयांवरील लेखांतून प्रामुख्याने तिची ओळख अशीच करून दिली जाते.

कादंबरीची सुरुवात ही कोल्हापूरचा पाव्हणा येण्याने होते. तो म्हातारी, बिनकामाची जनावरे विनाकारण पोसण्यात काही अर्थ नाही, जनावरे आणि शेतीकडे धंदा म्हणून पाहिले पाहिजे असे शहाणपण सांगतो आणि नारबाच्या मालकाच्या डोक्यात ट्रॅक्टरचे खूळ भरतो. मालकाला ते पटते आणि संबंध कादंबरीत तो तसा वागताना दिसतो. याउलट नारबाचा गोठ्यातील ढोरंगुरं, कुत्री-माजरं, कोंबडी इतकेच नव्हे तर विहिरीतील कासव, पिंपळाचे झाड, मोटेसारखी निर्जीव वस्तू यांवर नको तितका जीव बसलेला असतो. नारबा आणि मालक या दोन्ही प्रवृत्ती म्हणजे एक परंपरागत कृषिसंस्कृतीचे संवर्धन करणारी आणि दुसरी तिचा विध्वंस करणारी असून यातील पहिली सर्वसामान्यांचे आणि दुसरी खेड्यातील जमीनदार, श्रीमंत वर्गाचे प्रतिनिधित्व करणारी आहे, हे लेखक यातून सुचवितो.

कादंबरीमध्ये नारबाचा आपल्या गोतावळ्यातील प्रत्येक जीवावर बसलेला लळा दाखवून द्यायचे चालू असतानाच त्यातील एकेक जीव नारबापासून दूर गेलेला लेखक दाखवितो. यामध्ये लळा बसलेल्याचे जसे अतिरेकी चित्रण येते तसे ते दुःखाचेही येते. अशा अतिरेकी चित्रणातून लेखक संवेदनाशील वाचकांची त्यामध्ये भावनिक गुंतवणूक करून ठेवण्यात यशस्वी झाला आहे. म्हातारा होऊन घोडा आणि शिवलिंग्या बैल मरतो. एकमेकांवर प्रेम करणारी चंपी-नाम्या ही कुत्री मरतात. म्हालिंग बैल जिवंतपणीच मांगांना कापायला दिला जातो. टिक्की म्हैस, थोरली बैलं, शेरडं विकली जातात. गाय पांजरपोळात सोडली जाते. अशा दुःखाचा कमी-जास्त आघात करणाऱ्या ठराविक अंतराने घडणाऱ्या घटनांमुळे सुख-दुःखाचा खेळ संपूर्ण कादंबरीत सुरू राहतो.

नारबाच्या गोतावळ्याची भीषण वाताहात सुरू असतानाच मालकाची आवडती वस्तू ट्रॅक्टर येतो. हा ट्रॅक्टर या वाताहातीला प्रमुख जबाबदार दाखविलेला असल्याने तो नारबाचा दुश्मन बनतो. कादंबरीचा शेवट करीत असताना अंतिमतः जो परिणाम साधावयाचा आहे, त्याला अधिक टोकदार करण्यासाठी लेखक काही घटना घडवून आणतो. त्यामध्ये ट्रॅक्टरबरोबर आलेल्या ड्रायव्हरला चाण्या बैलाने लाथ मारणे, चिडून त्याने बैलाचा पाय मोडणे, नारबाला राग येऊन त्याच्याबरोबर भांडण करणे, ड्रायव्हरने मालकाचे कान भरणे आणि शेवटी मालकाने नारबाला चाकरी सोडून जायला सांगणे, या शेवटच्या कथाभागातील घटना आहेत.

अनुक्रमणिका

परंपरागत कृषिसंस्कृतीवरील हेच ते आक्रमण. कादंबरीची तशा प्रकारची रचना करून ते बिंबवले गेले आणि जाणकरांनी उचलून धरले. लेखकाने जे चित्रण केले आहे ते योग्य की अयोग्य, खरोखरच यांत्रिकयुग सर्वसामान्य ग्रामीण जनतेला उद्ध्वस्त करणारे आहे का, याचा फारसा गांभीर्याने विचार झालेला दिसत नाही. लेखक ग्रामीण समाजजीवनातील कोणत्या गोष्टींना महत्त्व देतो आणि कोणत्या देत नाही, ते त्याचे बरोबर की चूक हे खेड्यातील सामाजिक परिस्थितीचा विचार करून तपासलेले दिसत नाही.

ग्रामीण समीक्षक या नात्याने या कादंबरीच्या समाजशास्त्रीय अभ्यासाचे महत्त्वाचे मुद्दे सांगत असताना स्वतः आनंद यादव यांनी कादंबरीत आपण परंपरागत ग्रामीण कृषिसंस्कृतीवरील यंत्रयुगाचे आक्रमण चित्रित करून त्याविरोधी जी भूमिका घेतली आहे, त्याचे समर्थन केले आहे. त्यांच्या मते, "मालक हा कृषिसंस्कृतीचे मध्यवर्ती केंद्र; तर नारबा जणू त्या कृषिसंस्कृतीच्या आधाराने पोसणाऱ्या गावगाड्यातील अलुतेदार-बलुतेदार मजूरवर्ग यांचे प्रतिकात्मक केंद्र असतो. नव्या सुधारणावादी युगात त्याची (नारबाची) शोकांतिका म्हणजे या सर्वांची शोकांतिका असते. मालकाचा तेवढा वैयक्तिक स्वार्थ साधला जातो. पण या सर्वांचा कडेलोट होतो."[१] 'गोतावळा' कादंबरीविषयी दिलेल्या मुलाखतीत ट्रॅक्टरला विरोध म्हणजे नव्या सुधारणांना विरोध नव्हे का? या थेट प्रश्नाचे उत्तर त्यांनी जे दिले आहे त्यामध्ये ते म्हणतात, "नारबाचा विरोध ट्रॅक्टर येण्याला, ड्रायव्हर येण्याला किंवा मालकाच्या सुधारणांना नाही. त्याचा विरोध या सर्वांमुळं त्याचं अस्तित्व नष्ट होऊन जाणार आहे म्हणून त्या गोष्टींना आहे. त्या सुधारणांत किंवा नव्या युगात त्याला कुणीच सामावून घेत नाही आणि त्याचं, त्याच्या भोवतालचं विश्व (की जे त्याच्या अस्तित्वाला जपत, जोपासत होतं) मात्र सर्वांनी मिळून नष्ट करून घातलंय म्हणून त्याचा आक्रोश आहे."[२]

कादंबरीत घेतलेल्या यंत्रयुगाविरोधी भूमिकेचे आनंद यादव यांचे हे समर्थन पटण्यायोग्य नाही. त्यांनी नारबाच्या अस्तित्वाचा मुद्दा उपस्थित केला आहे. नव्या सुधारणांनी नारबाचे अस्तित्व धोक्यात येणे म्हणजे सर्वसामान्य कष्टकरी, बलुतेदार यांचे अस्तित्व धोक्यात येणे होय. त्यामुळे आनंद यादव यांना ट्रॅक्टर हा सर्वसामान्यांना परंपरागत कृषिव्यवस्थेतून हाकलून लावणारी वस्तू वाटते.

आनंद यादव यांनी यंत्रयुगाचे आक्रमण दाखवून दिलेल्या ट्रॅक्टरचा विचार केला तर शेतीविकास प्रक्रियेतील ट्रॅक्टरचे योगदान आज कोणताही शेतीतज्ज्ञ नाकारणार नाही. शेतीसाठी शेतकऱ्यांना मिळालेले ते एक फार महत्त्वाचे यंत्र आहे.

ट्रॅक्टर गुराढोरांच्यावर परिणाम करण्याचा प्रश्नच येत नाही. ट्रॅक्टर दूध, शेणामुताचे खत देत नाही. ट्रॅक्टर आणि बैलजोडी शेतीची मशागत करीत असले तरी ती एकमेकाला पर्याय नव्हेत. खेड्यात जाऊन एखाद्या शेतकऱ्याला विचारले तर तो व्यवस्थित समजावून सांगेल. ट्रॅक्टर किंवा यंत्रयुगामुळे गुराढोरांचे महत्त्व कमी झालेले आज दिसत नाही. उलट विज्ञानामुळे दूधउत्पादनक्षेत्रात आज क्रांतिकारक बदल झालेला आहे.

गुराढोरांसारखेच यंत्रयुगामुळे शेतीसाठी मानवी श्रमाचे महत्त्व कमी होत नाही. नारबासारख्या प्रामाणिक, कष्टाळू नोकराला एक अत्यंत व्यवहारी मालक केवळ ड्रायव्हरबरोबर भांडण केले म्हणून काढून टाकतो हे पटत नाही. नारबाचे काम ट्रॅक्टर आणि ट्रॅक्टरचा ड्रायव्हरही करणार नसतो. लेखकाला सर्वसामान्यांचे, बलुतेदारांचे अस्तित्व यंत्रयुगामुळे धोक्यात आले आहे हे दाखवून द्यायचे आहे. त्यासाठी कादंबरीच्या शेवटी अशी घटना घडवून आणली आहे.

खेड्यातील सर्वसामान्य शेतकरी, शेतमजूर आणि दलित समाजाच्या दुःखी-कष्टी, शोषित जीवनाचा विचार करणाऱ्या म. फुले आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी यंत्रयुगाला विरोध केला नसून त्याचे स्वागत केले आहे. शेतीचे आधुनिकीकरण झाले पाहिजे, शेती हा व्यवसाय असल्याने नफ्या-तोट्याचा विचार झाला पाहिजे, असे महात्मा फुले यांनी सांगितले आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी वतनदारी-बलुतेदारी नष्ट झाली पाहिजे यासाठी आंदोलन उभारले होते. तसा कायदा व्हावा म्हणून मुंबई कॉन्सिलात बिल आणले होते. बलुतेदारीला विरोध नोंदवताना डॉ. गंगाधर पानतावणे म्हणतात, "लाचारी, अगतिकता आणि दुसऱ्याच्या ओंजळीने पाणी पिण्याची प्रवृत्ती नाकारल्याशिवाय आत्मप्रतिष्ठा प्राप्त होणार नाही. हे जाणूनच इतर बलुतेदारांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या स्वाभिमानाचा विचार आत्मसात केला पाहिजे."[३] कष्टकरी, बलुतेदार यांच्या हितासाठी आनंद यादव यांनी घेतलेली यंत्रयुगाविरोधी भूमिका चुकीची आहे आणि बलुतेदारी टिकवून ठेवण्यापेक्षा ती नष्ट होणे गरजेचे आहे, हे यातून स्पष्ट होते.

ट्रॅक्टरमुळे नारबाची चाकरी जाते हे कादंबरीत दाखवून दिलेले मान्य केले तरी ती नारबाच्या जीवनातील दुःखकारक घटना नव्हे. कारण चाकरीत त्याच्या वाट्याला पशुपातळीवरचे जीवन आले आहे. चाकरीमुळे तो उद्ध्वस्त झाला आहे. त्यामुळे ट्रॅक्टरमुळे तो उद्ध्वस्त होण्याचा प्रश्नच येत नाही. कादंबरीतील नारबाचे चाकरीतील जीवन बघितल्यास ते समजून येते.

नारबा पाच वर्षांचा असताना बाप आणि पंधरा वर्षांचा असताना आई मेली आहे. आईवडिलाविना पोरका झालेला नारबा रामू सोनवडेकडे चाकरीला राहतो. मालक चार वर्षांत लग्न करून देण्याचे वचन देतो पण वीस वर्षे झाली तरी दिलेले वचन पूर्ण करीत नाही. चाकरीमध्ये पगार नाही फक्त दोन वेळचे जेवण आणि अंगावर लागणारा कपडालत्ता. एवढ्यावरच मरमर मरायचे. कामाला ठराविक वेळ नाही. दिवस-रात्र शेतातच. गुराढोरांची उगानिघा बघायची. शेतीची कामे करायची. असे हे चाकरीचे जीवन म्हणजे गुलामगिरीचे जीवन होय. त्यामुळे चाकरी जाणे ही नारबाच्या जीवनातील फार मोठी दुःखकारक घटना नव्हे. एखाद्या सरकारी नोकरदाराची नोकरी गेल्याने त्याच्या जीवनात बेकारी येऊन पोटापाण्याचा प्रश्न उभा राहतो तसा प्रश्न चाकरी गेलेल्या गड्यासमोर उभा राहत नाही. त्याला नवीन चाकरी शोधावी लागत नाही. श्रीमंत जमीनदार अशा माणसाच्या शोधातच असतात आणि प्रामाणिक चाकर मिळाला की त्याला सोडता सोडत नाहीत. त्याच्या अज्ञानाचा आणि गरीबीचा फायदा घेऊन त्याच्याकडून जनावरासारखे काम करून घेतात. प्रसंगी खोटी आश्वासने देतात. रामू सोनवडेने तेच केले आहे.

कादंबरीत नारबा आपले चाकरीतील हे भयानक दुःख अगदी मोजून तीन-चार वेळाच सांगतो. बाकी सर्व कादंबरीमध्ये तो आपल्या गोतावळ्यावरच बोलतो.

वीस वर्षे जनावरासारखे काम करणाऱ्या नारबाला ट्रॅक्टर आल्यानंतर मालक हाकलून देतो. त्यावेळी नारबा म्हणतो, "... चला! रग्गड झालं आता. आता नगंच ऱ्हायला.... म्हालिंग-शिवलिंग, नाग्या-वाघ्या, राम्या-भिम्या, गायरा-म्हसरांनु, चला. किड्या-मुंग्यांनु, माशा-गोमाशांनु तुम्हीबी चला..... मातीतल्या मुळकांडा, तुबी चल. राना, तुबी चल. समदा गोतावळा घेऊन असंच माळानं माळ हुडकत जाऊ. मळा हुडकत जाऊ. हितं आता कोण हाय आपलं? आता पिकं ट्याक्टरनं येतील. इंग्रजी खतानं दुप्पट फुलतील. खंडी-खंडीनं पिकल नि मालक ट्याक्टरनं म्हैना-म्हैनाभर सुगी वडल. त्याता आपलं काय? समदं डायव्हरच्या हातचं. ट्याक्टरच्या मालकीचं.... तुमची-आमची तोंडं बंद, पिकंबी बंद नि हात-पाय बी बंद." (पृ. १४२)

मालकाने आपणाला कोणती वागणूक दिली? किती काम करून घेतले? त्याचा मोबदला किती दिला? लग्न करून देण्याचे दिलेले वचन पाळले का? अशा प्रश्नांचे मोहोळ त्याच्या समोर उभे न राहता तो आपला गोतावळा घेऊन जाण्याची भाषा बोलतो. गोचिडासारखी चिकटलेली चाकरी त्याला का झिडकारू वाटत नाही? त्या जीवनाचा त्याला वीट का येत नाही? आपले आयुष्य उद्ध्वस्त करणाऱ्या मालकाचा त्याला राग का येत नाही? चंद्रकांत बांदिवडेकरांना नारबाचे वागणे फार आवडते. त्याचे कौतुक करताना ते म्हणतात, "शिक्षणाचे व संस्कृतीचे जाणीवपूर्वक संस्कार न झालेल्या एका अतिसामान्य शेतमजुराच्या मनावर भारतीय संस्कृतीत सहजपणे होणाऱ्या संस्कारांनी केवढं मोठेपण, केवढी असामान्यता उत्पन्न केली याचं अतिशय वास्तववादी चित्र आनंद यादवांनी सहजपणाने काढलं आहे. हे सहजपण कलात्मक सामर्थ्यातून प्राप्त झालेले आहे. नारबाचं सहसा लक्षात न येणारं मोठेपण किंवा त्याची असामान्यता त्याच्या आपल्या गोतावळ्यात उत्कट प्रेमभावनेने गुंतून जाण्यात आहे. हे नीट ध्यानात येण्यासाठी गोतावळ्याचं एकंदर स्वरूप आणि नारबाचे त्याच्याशी जुळलेले हृदयाचे बंध समजून घेणे आवश्यक आहे."[४] लेखकाने नारबाच्या दुःखी जीवनाचे जे वैभवीकरण केले आहे त्याला या अभिप्रायातून चंद्रकांत बांदिवडेकर उचलून धरताना दिसतात.

नारबाचा मालक रामू सोनवडे शेतात काम करताना आणि जनावराच्या शेणामुतात हात घालताना कधीही दिसत नाही. सर्व कामे तो आपल्या मजुरांकडून करून घेतो. म्हणजे तो जमीनदार आहे; शेतकरी नाही. शेतीकडे आणि गोठ्यातील जनावरांच्याकडे तो धंदा म्हणून बघतो. पडीक जमिनीतील झाडे तोडून ती जमीन तो पिकाखाली आणतो. भाकड, म्हातारी जनावरे पाळणे त्याला मूर्खपणाचे वाटते. विज्ञानाने निर्माण केलेल्या साधनांचा तो शेतीसाठी वापर करायला लागतो. शेतीसाठी त्याने स्वीकारलेला व्यवहारी आणि आधुनिक दृष्टिकोन फारच चांगला आहे. लेखकाने मात्र परंपरागत ग्रामीण संस्कृतीच्या नावाखाली त्याविरोधी भूमिका घेतली आहे.

नारबाला तो जनावरासारखा राबवून घेतो. अन्यायकारी वागणूक देतो. हा त्याचा फार मोठा गुन्हा आहे. तो निर्दयी

आहे हे नारबाला दिलेल्या वागणुकीतून दिसून येते. गुराढोरांच्याकडे बघण्याची त्याची जी व्यवहारी आणि कोरडी दृष्टी आहे, तीच नारबाकडेही बघण्याची आहे. त्याच्या हिशेबी नारबा आणि जनावरे एकच आहेत. त्याच्या फसवेगिरीमुळेच नारबाची बायका-पोरांविना वर्षानुवर्षे गेली आहेत.

सर्वसामान्य ग्रामीण जनतेचे रामू सोनवडेसारखे जमीनदार शोषण करीत आले आहेत. या मुठभर लोकांच्याकडे मोठ्या प्रमाणावर जमिनी आहेत. बाकीचे बहुसंख्य शेतकरी अल्पभूधारक आणि शेतमजूर आहेत. भारतातील जमीनधारणा पद्धती ही ग्रामीण समाजातील विषमतेला जबाबदार आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या मते, "या जमीनधारणा पद्धतीमुळे भारतीय समाजावर खोलवर परिणाम झालेले आहेत. समाजातील दलित व भूमिहीन वर्गाचे जमीनदाराकडून मोठ्या प्रमाणावर सामाजिक व आर्थिक शोषण होत आहे. समाजातील बहुसंख्याकांना 'भूदास' म्हणून जगावे लागत आहे. म्हणून असे म्हणावे लागते की, भारतीय जमीनधारणा पद्धती लोकशाही आणि समाजवादाविरोधी आहे."[५]

स्वातंत्र्योत्तर काळात १९६५-६६ नंतर देशात हरितक्रांती सुरू झाली. शेतकऱ्यांना सुधारीत बी-बियाणे मिळू लागली. कमी दरात कर्जाची सोय झाली. मात्र याचा फायदा सधन जमीनदारांनाच मिळाला. पंचवार्षिक योजनांमधून सरकारने जो लाखो-कोटी रुपयांचा खर्च शेतकऱ्यांच्यासाठी केला तो सर्वसामान्य शेतकरी, शेतमजूर यांच्यापर्यंत आला नाही. एच-एम. देसरडा म्हणतात, "सधन शेतमालक वर्गाची जी प्रभावळ उभी राहिली आहे व ग्रामपंचायतीपासून ते मंत्रीमंडळापर्यंत ज्यांची जबरदस्त पकड आहे तेच आज विकासाचे मुख्य मारेकरी बनले आहेत. सहकारी सेवा संस्थांचा सर्व लाभ या लब्धप्रतिष्ठितांनी पुरेपूर घेतला असून राजकीय व आर्थिक सत्ता त्यांच्या हाती केंद्रित झाली आहे. शेतमजुरांच्या संघटना महाराष्ट्रात ठिकठिकाणी जे लढे देत आहेत त्याची सर्व शक्तीनिशी ही मंडळी मुस्कटदाबी करीत आहेत."[६]

ग्रामीण समाजातील हे भयानक सामाजिक वास्तव आहे. आनंद यादव यांनी ते दाखवून द्यायला पाहिजे होते. त्यासाठी नारबाच्या गोतावळ्याऐवजी त्याच्या चाकरीतील दुःखाचे अधिक सविस्तर चित्रण करायला पाहिजे होते. तसे केले असते तर ही कादंबरी जमीनदाराच्या अत्याचाराची कथा बनली असती आणि वाचकांना नारबाचा उद्ध्वस्त झालेला गोतावळा बघून दुःख वाटण्याऐवजी नारबाचे चाकरीतील दुःख बघून अस्वस्थ वाटले असते. ग्रामीण समाजातील शोषितांची कैफियत आणि शोषकांची अत्याचारवृत्ती कादंबरीतून प्रत्ययकारीरीत्या प्रकट झाली असती तर या कादंबरीला एका चांगल्या सामाजिक कादंबरीचे स्वरूप प्राप्त झाले असते.

या कादंबरीची जमेची बाजू म्हणजे रामू सोनवडेचे पात्र होय. संपूर्ण कादंबरीमध्ये या पात्राचे वर्तन वास्तवाधिष्ठित ठेवण्यामध्ये लेखक यशस्वी झाला आहे. त्यामुळे हे पात्र अस्सल वाटते. याउलट सर्वसामान्यांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या नारबाच्या पात्राचे झाले आहे. कादंबरीचे निवेदक आणि प्रमुख असलेले हे पात्र अस्सल ग्रामीण वाटत नाही. नारबाभोवती लेखकाने पशुपक्ष्यांचा गोतावळा निर्माण करून त्या गोतावळ्यावर लळा बसलेला दाखविलेला आहे. नारबा म्हणतो, "मालक मनातनं उतरला असला तरी ढोरं जिवात गुंतल्यात. मन मातीत अडीकलंय. पिकापाण्याच्या नि झाडाझुडपांच्या मुळाकांडागत झालंय...." (पृ. ६४) नारबाचा गोतावळा आणि गोतावळ्यातील नारबाचे वर्तन सर्वांच्या कुतूहलाचा विषय झाले आहे. निसर्गात, पशुपक्ष्यात रमणाऱ्या ग्रामीण माणसाचे जग हे शहरी माणसापेक्षा कसे वेगळे असते हे आनंद यादव यांनी दाखवून दिलेले समीक्षकांनी फार उचलून धरले आहे. ते धरत असताना ग्रामीण माणसाचा खरोखरच असा गोतावळा असतो का? तो त्यात असा रमतो का? याचा फारसा गांभीर्याने विचार कोणी केलेला दिसत नाही.

ग्रामीण माणसाचे शेतीवर जीवन अवलंबून असते. शेतीचा तुकडा त्याला आपल्या काळजाचा तुकडा वाटतो. काळ्या आईवर त्याचे फार प्रेम असते. शेती म्हटले की, गुरेढोरे आलीच. आपल्याबरोबर शेतीत राबणारा एखादा गुणी बैल त्याला आपल्या जीवासारखा वाटतो. दुधदुभत्याला चांगली असणाऱ्या एखाद्या गाई-म्हैशीने त्याच्या संसाराला हातभार लावलेला असतो. त्याच्या पोराबाळांना तिने आपल्या दुधावर पोसलेले असते. अशा जनावरावर त्याचा लोभ जडतो. राखणीचा प्रामाणिक कुत्रा त्याला फार मोठा आधार वाटतो. पण त्याचबरोबर एखाद्या मुर्दाड, वाईट जनावराला तो बाजार दाखवायला मागेपुढे बघत नाही. आपणाला पेलेल इतकीच जनावरे तो पाळतो. घरच्या अडीअडचणीला प्रसंगी एखादे जनावर विकायचा तो निर्णय घेतो. सोन्याचा बैल किंवा एखादे दुभते जनावर दगावले तर तो अडचणीत येतो. पैशाची जमावा-

जमव करून त्याला पुन्हा गोठ्यात जनावर उभे करावे लागते. सर्वसामान्य ग्रामीण माणसाचा गुराढोरांशी असा संबंध असतो.

'गोतावळा' कादंबरीत नारबाचा जो गोतावळा आहे, त्यापैकी नारबाच्या मालकीचे कांही नसते. बैले, रेडे मालकाच्या शेतात काम करतात. गाई-म्हेशींच्या दुधावर मालकाचा हक्क आहे. जनावरे सांभाळल्यामुळे नारबाचा वैयक्तिक आर्थिक काहीच फायदा होत नसतो. असे असतानाही त्याचा त्यांच्यावर जीव बसलेला आहे. गोठ्यातील असे एकही जनावर नाही की त्याच्यावर नारबाचा जीव बसलेला नाही. एखादे जनावर मेल्यावर त्याला जसे दुःख होते तसे ते विकल्यावरही होते. जनावर विकल्याने आपले काम कमी झाले याचा विचार नारबा करताना दिसत नाही. नारबाची भावनिक गुंतवणूक केवळ गोठ्यातली गुराढोरांच्यावर नाही. त्याच्या गोतावळ्याची संख्या बरीच मोठी आहे. आपल्या गोतावळ्यातील कोंबडा कापला, पिंपळाचे झाड तोडले, मोटा काढल्या म्हणून नारबाला दुःख होते, हे पटण्यासारखे नाही. कोंबडा हा कापून खाण्यासाठीच असतो हे ग्रामीण माणसाला चांगले माहीत असते. मोटा गेल्यानंतर नारबाला पाठीमागचा दिनक्रम आठवतो. तो म्हणतो,

"…. मोटा हुत्या तवा मला पाटंपासनं गजबजायचा. चाण्णी उगवाय उठायचं. मी उठलेला बघून ढोरं आई मागनं लेकरं उठल्यागत चटाचटा उठायची. त्यास्नी वैरणी टाकायच्या. माझी शेणंघाणं भरायची गडबड नि ढोरांची गपागपा वैरणी खाऊन मोटंला गडबड. दिसाचा गोंडा म्हवराय मोटांची झुम्मड. चाकांचं नाद, लावण्या, हिकडंतिकडं मारलेल्या हाका ….. असा मळा. रामपाऱ्यातच उठून देवाचं नाव घेत उद्योगाला लागलेला. एखादा चिरा ऱ्याला की मग दिसाचं उगवणं. पाटाच्या पाण्यात किरणाच्या आंघुळी. आता किरणं पारूशीच वर आली. अंगावर येऊन मुक्यानंच तापू लागली. कुडातनं बाहीरचं समदं भगभगीत दिसू लागलं" (पृ. १३७) मोटा गेल्याने नारबाला दुःख झाले आहे, असे लेखक त्याच्या बोलण्यातून दाखवून देतो. एक चाकरीचा गडी म्हणून काम कमी झाले याचा आनंद त्याला व्हायला पाहिजे होता.

ग्रामीण माणूस निसर्गाच्या, पशुपक्ष्यांच्या सानिध्यात असतो. शहरी माणसापेक्षा ग्रामीण माणसाची निसर्गाशी अधिक जवळीक असते. पण त्याला निसर्गाचे आकर्षण नसते. निसर्गात रमतो तो केव्हातरी शहराच्या दगदगीतून बाहेर गेलेला शहरी माणूस. त्यालाच निसर्गाचे, पशुपक्ष्यांचे कुतूहल वाटते. ढोरमेहनत करणाऱ्या ग्रामीण माणसाला त्यात काही नावीन्य वाटत नाही. म्हणून कुकुडकोंबडा, बोका, बळबंक्या यांचे निरीक्षण हे ग्रामीण माणसाचे नव्हे. "खतात खत-किडं अंगठ्या-अंगठ्यागत मोठं. खोरं मारल्यावर खताचा ढपळा पायावर पडला नि आतनं वाफा निघाल्या. पायाला चाटदिशी चटका बसला. ऊन-ऊन जाळ खत. त्यात हे खत-किडं जितं. एवढ्या खताच्या आत कुठनं गेलं नि कसं जन्माला आलं देवाला ठावं. एकट्यापुरती जागा करून एकटंच जल्मलेलं… खत खाऊन खाऊन एकटंच मरून जायचं. मेल्यावर हुतं तसं पेलंच पेलंखत. ओशिदाला म्हटलं तर हाड न्हाई. रगात न्हाई. अंगात नुसतं काळं काळं पाणी. अंग मातूर पांढरं." (पृ. ५४) वास्तविक खत भरण्याचे काम हे फार त्रासाचे आणि घाणीचे असते. लेखक ते दाखवून देत नाही. नारबाचे खतकिड्याविषयीचे हे कुतूहल ग्रामीण माणसाचे नव्हे.

"…. 'हेऽहेऽ' करून खच्चून वराडलो. आभाळाचं पिल्लू होऊन त्येच्या पख्ख्याबुडी जावंसं वाटलं. समदं रान टवटवीत बघून मन मोकळं मोकळं झालं. अंतराळी व्हावंसं वाटू लागलं…. समद्या माळभर, रानभर, उसावरनं, पिकावरनं तरंगत-तरंगत फिरून यावं, समदं न्याहाळावं, कुरवाळावं. उरासंगं धरून मिठी मारावी….. हे समदं आपलंच. आपल्यातनं उगवलेलं. उगीवतंय, उगीवतंय नि भराला आलेल्या बाईगत फुलुन येतंय. हाका मारतंय. अंगावर घे म्हणतय. लोळ म्हणतंय. चिखूल, माती, पाणी, पिकं हो म्हणतंय…. कसं व्हायचं हे? कसं लोळायचं? कसं अंगावर घ्यायचं? …. समदं आभाळबुडी दन्नाट पसरलेलं. मी एवढा एवढासा. हातात काय येणार नि डोळ्यात तरी किती मावणार? ईस सालं अशीच गेली. समोरनं येत येत डोळ्यांदेखत मागं सरकली. किती म्हणून तरी डोळ्यांनी धरायचं?" (पृष्ठे ९२, ९३) हे ग्रामीण मनातून आले आहे, असे वाटत नाही.

कुत्रीचा मृत्यू झाल्यानंतर तिच्यावर प्रेम करणाऱ्या कुत्र्याने दिलेले बलिदान, घोड्याच्या मृत्यूचे केलेले कारूण्यरम्य वर्णन, त्याच्या मृत्यूचे आणि कोंबडा कापल्यानंतरचे नारबाला झालेले अतिव दुःख, पिंपळाचा तोडला जाणारा आणि तोडलेला वृक्ष बघून नारबाला झालेले अनावर दुःख, ट्रॅक्टर आल्यानंतर घडणारे घटनाप्रसंग यासंबंधीचे आलेले चित्रण हे अवास्तव वाटते.

कादंबरीत वर्णन केलेला कोंबड्याचा प्रताप, कुत्रा-कुत्रीचा खेळ, कुत्र्यांनी ससा धरलेल्याचे वर्णन, गुराने घुबड मारलेल्याचे

वर्णन, जान्या मांग बेडक्या धरत असलेल्या प्रसंगाचे वर्णन, विंचू धरून त्याच्याबरोबर मुलांनी खेळण्याच्या प्रसंगाचे वर्णन, नारबाला झालेले मोराचे दर्शन, नारबाने कावळा मारणे यातून अस्सल ग्रामीण जीवनानुभव प्रकट होत नाही. या सर्वांतून केवळ वाचकांचे रंजनच होते.

चाकरीमध्ये आपले जीवन उद्ध्वस्त करून घेतलेल्या नारबाचा चाकरीच्या कामातील प्रत्येक क्षण आणि क्षण हा त्या कामाचा तिटकारा आणणारा आणि दुःखकारक असायला पाहिजे होता. पण लेखक तसे दाखवत नाही. नारबा आपल्या गोतावळ्यात गुंततो. आपल्याबरोबर वाचकांनाही गुंतवतो. वाचकांना खेड्यातील नवनवीन माहिती सांगतो. शहरी वाचक तर घरबसल्या खेड्यातील जीवनाचा आनंद उपभोगतो. "नारबाप्रमाणे आपणही ह्या जीवसृष्टीमध्ये केव्हा रस घेऊ लागतो ते आपणांस कळत नाही. ह्या जीवसृष्टीचे बारीकसारीक व्यवहार हे आपणांस न कळत आपल्या कुतूहलाचे विषय बनू लागतात. आपण त्यात रंगून जातो. माणूस आणि पशुपक्षी ह्या उभयतांची जगं एकमेकांमध्ये मिसळून जात असतात. आपल्या कुतूहलाचा संभ्रम निर्माण व्हावा अशा प्रकारे ही जगं एकत्र येत असतात व दूर जात असतात. ट्रॅक्टर येतो. शेत उजाड होते. गुरंढोरंच नव्हे तर वडपिंपळही जातात. नारबा शेवटी शेत सोडून जातो. त्याबरोबरच आपण ह्या अपूर्व सृष्टीचा निरोप घेतो."[७] या अभिप्रायातून वा.ल. कुलकर्णी यांनी 'गोतावळा' कादंबरीचे कौतुक केले असले तरी माझ्या मते या अभिप्रायातच ग्रामीण कादंबरी म्हणून या कादंबरीचे फार मोठे अपयश आहे.

सारांश, नारबाच्या पात्राभोवती गोतावळा निर्माण करून त्यातून सर्वसामान्य ग्रामीण माणसाच्या दाखवून दिलेल्या भावविश्वाचे चित्रण हे अवास्तक, रंजक झाले आहे आणि अशा अवास्तक, रंजक चित्रणाला सर्वसामान्यांच्या कळवळ्याचा मुलामा देऊन आधुनिकीकरणाविरोधी जी भूमिका घेतली आहे ती चुकीची आहे. गोठ्यातील जनावरे विकणे, ट्रॅक्टर घेणे, विहिरीवरील मोटा काढून पाणीपंप बसविणे, पडीक जमिनीतील झाडे तोडून जमीन पिकाखाली आणणे, कोंबडा कापून खाणे यामध्ये गैर काही नाही आणि त्यामध्ये सर्वसामान्य कष्टकरी, शेतमजूर यांचे कोणतेही नुकसान नाही. या गोष्टी सर्वसामान्यांच्या प्रश्नांशी संबंधित नाहीत. आतापर्यंतच्या विवेचनातून हे स्पष्ट होते.

## संदर्भ


१. यादव आनंद - 'गोतावळ्याची समाजशास्त्रीय समीक्षा : काही मुद्दे', आनंद यादव यांची गोतावळा - साद आणि प्रतिसाद, संपा. किर्ती यादव, प्रतिमा प्रकाशन, पुणे १९९१, पृ. १२७.

२. यादव आनंद - 'गोतावळा' वरील काही आक्षेपासंबंधी लेखकाच्या प्रतिक्रिया (मुलाखत), 'आनंद यादव यांची गोतावळा - साद आणि प्रतिसाद', उनि., पृ. १८२.

३. पानतावणे गंगाधर - 'बलुतेदार', लेखक - प्रल्हाद लुलेकर, संवेदना प्रकाशन, औरंगाबाद, प्रस्तावना, पृ. ११.

४. बांदिवडेकर चंद्रकांत - 'कृषि-संस्कृतीच्या पराभवाची कथा 'गोतावळा', 'आनंद यादव यांची गोतावळा - साद आणि प्रतिसाद, उनि., पृ. ५९.

५. आंबेडकर बाबासाहेब - 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि जमीनधारणा', लेखक डॉ. सु.दा. तुपे, 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर गौरव ग्रंथ', महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई १९९३ पृ. ४०२ या ग्रंथातून उद्धृत.

६. देसरडा एच.एम. - 'महाराष्ट्रातील शेतीची कुंठित अवस्था रौप्य महोत्सवी वर्षात एक दृष्टिक्षेप', 'महाराष्ट्र राज्य रौप्य महोत्सवी वर्ष, कृषि औद्योगिक समाजाची २५ वर्षे,' प्रकाशक - शांताराम गरूड, सरचिटणीस, समाजवादी प्रबोधिनी, इचलकरंजी, पृ. ९९.

७. कुलकर्णी वा.ल. - 'मराठी कादंबरीला नवे परिमाण देणारी 'गोतावळा', 'आनंद यादव यांची गोतावळा - साद आणि प्रतिसाद', उनि., पृ. १५.


**

# जीर्णोद्धार

## लेखांक ७ : 'सभारंजनी'

**श्री.मा. भावे**

– १ –

एकोणिसाव्या शतकाचे पहिले दशक हा फारच धामधुमीचा काळ होता. मोंगल बादशाही दुबळी झाल्याला शंभर वर्षे लोटली होती. साम्राज्याचे निरनिराळे सुभे स्वतंत्र झाले होते. या फाटाफुटीला कब्जात आणण्याचा प्रयत्न मराठ्यांनी बराच काळ केला. पण १८व्या शतकाच्या अखेरीला मराठेशाहीला उतरती कळा लागली. शेवटचा पराक्रमी मराठा सरदार महादजी शिंदे १७९५ साली वारला. त्याच्या ताब्यात पंजाबपासून नर्मदेपर्यंतचा प्रदेश होता आणि मोंगल बादशहा शहा-आलम हा त्याचा आश्रित होता. राजस्थान, बुंदेलखंड, आजचा हरयाना येथील संस्थानिक शिंद्याच्या लगामी होते; पण महादजी गेला आणि शिंद्यांच्या सत्तेला ग्रहण लागले. इकडे महाराष्ट्रातही परिस्थिती बिकट झाली होती. यशवंतराव होळकराने पुण्यावर स्वारी केली. पेशवा दुसरा बाजीराव कोकणाकडे पळून गेला. पुण्यातील प्रजेकडून पैसे उकळण्यासाठी होळकराने अनन्वित अत्याचार केले.

याच वेळी ईस्ट इंडिया कंपनीने लॉर्ड वेल्सली याला हिंदुस्थानात गव्हर्नर जनरल म्हणून पाठविले. त्याचा भाऊ आर्थर वेल्स्ली हा इंग्रजांच्या हिंदुस्थानातील सैन्यात अधिकारी म्हणून त्या आधी थोडाच काळ दाखल झाला होता. आर्थर वेल्स्ली हा पुढे 'ड्यूक ऑफ वेलिंग्टन' या नावाने प्रसिद्धीस आला. त्याने नेपोलियनचा पराभव वॉटर्लू येथे केला. अशी ही कर्तबगार भावांची अद्वितीय जोडी या मोक्याच्या काळात हिंदुस्थानाच्या भवितव्यावर दीर्घकाळासाठी प्रभाव पाडावा म्हणून अवतरली होती. लॉर्ड वेल्स्ली विषयी 'रियासत'कार सरदेसाई लिहितात,' 'एवढा जबरदस्त पुरुष ग.ज. चे जाग्यावर दुसरा कोणी आलाच नाही असे म्हटले तरी चालेल. स्वराष्ट्राच्या बडेजावाची निसीम हाव, लांब पल्ल्याची पोचदार दृष्टी, नानाविध साधनांची योग्य जुळणी करण्याचे चातुर्य, कामाचा उरक, पराकाष्ठेचा आत्मविश्वास, जबाबदारी अंगावर घेण्याची उत्सुकता, दर क्षणी बदलणाऱ्या परिस्थितीस तोंड देण्याची धमक, अकुंठित कल्पकता, विरोधकांस नमविणारी लेखन-शैली, अशा अनेक गुणांनी युक्त होण्यासाठी ही स्वारी खरोखरच हिंदुस्थानाच्या भवितव्यात काही प्रचंड उलाढाली केल्याशिवाय राहणारी नव्हे, असे भाकित कोणीही केले असते.

हिंदुस्थानातील अंदाधुंदीची परिस्थिती पाहून लॉर्ड वेल्स्लीने निर्णय घेतला की, परस्परांशी झुंझणाऱ्या सत्ताधीशांना इंग्रजी सार्वभौमत्वाची वेसण घालून काबूत ठेवले तरच इथे शांतता नांदेल आणि देशात पुनः आबादी होईल. इंग्रजी अंमलाखालीच इथे शांतता स्थापन होऊ शकेल! त्याने प्रथम टिपूचा बीमोड केला. टिपू स्वतः मारला गेला आणि त्याचे राज्य इंग्रजांनी ताब्यात घेतले. (म्हेसूरला टिपूच्या राज्याचे मूळ मालक घराणे जे वोडियार त्यांचे मांडलिक राज्य उभे केले.) नंतर तैनाती फौजेचा तह करून निजामाचे हात-पाय आवळले. दुसरा बाजीराव यशवंतराव होळकराच्या भीतीने वसईला पळाला व तेथे त्याने इंग्रजांशी तैनाती फौजेचा तह केला. बाजीरावाला आर्थर वेल्स्लीने वसईहून पुण्याला आणले व त्याची पुनः गादीवर स्थापना केली. त्यानंतर आर्थर वेल्स्लीने शिंदे व भोसले यांचा असईच्या लढाईत पराभव केला (१८०३). याच सुमारास लॉर्ड वेल्स्लीने जनरल लेक याच्या हाताखाली फौज तयार करून शिंद्याच्या उत्तरेतील राज्यावर चढाई केली. लेकने दिल्ली जिंकली आणि शहा-आलम बादशहाला ताब्यात घेतले. हिंदुस्थानचा ताबा इंग्रजांकडे या वेळी गेला.

जोपर्यंत इंग्रज हे केवळ प्रादेशिक सत्ता होते तोपर्यंत इंग्रजांची हिंदुस्थानी लोकांकडे पहाण्याची दृष्टी पूर्वग्रहविरहित होती. पण इंग्रज, वर सांगितल्याप्रमाणे, सार्वभौम झाल्यावर पराभूत अशा हिंदी लोकांविषयी एक प्रकारची तुच्छता त्यांच्या मनात शिरली. या त्यांच्या मनोवृत्तीचे कडवट रूप जेम्स मिल याने लिहिलेल्या हिंदुस्थानच्या इतिहासात आढळते. मिलने १८०६ साली हा इतिहास लिहावयास सुरुवात केली आणि दहा खंडात तो इतिहास पुरा केला. (१८१७) या इतिहासात ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभारावर मिलने सडकून टीका केली होती. त्याचे बक्षिस म्हणूनच की काय, कंपनीने त्याला दांडग्या पगाराची नोकरी दिली! मिलच्या इतिहासाचे सार,





अनुक्रमणिका

आपल्या दृष्टीने सांगायचे तर, असे आहे की, हिंदुस्थानातील समाज हा अज्ञान, रूढी, अंधश्रद्धा, अंदाधुंदी अशा दोषांनी ग्रासलेला आहे. इंग्रजी राज्यकर्त्यांचे हे परम कर्तव्य आहे की, त्या समाजाला मानवजातीच्या इतिहासातील मुख्य प्रवाहात आणून सोडायचे.

कंपनीच्या अंमलाखाली हिंदुस्थानाचे नवीन नवीन सुभे झपाट्याने येत चालल्यामुळे ते काहीसे गांगरूनच गेले असावेत. अखेर इथल्या प्रजेशी, प्रदेशाशी व प्रश्नाशी 'जागेवरचा मनुष्य' म्हणून त्यांना भिडावे लागणार होते. अशा अधिकाऱ्यांनी इथले रीतिरिवाज, येथे उत्पन्न होणारी पिके व फळ-फळावळ, इथले हवामान, लोकांची मनोवृत्ती व राहणी, नद्या, नाले, डोंगर, खनिजे, रस्ते, शिक्षण व न्यायव्यवस्था, लोकांचा इतिहास अशा गोष्टींची माहिती करून घेण्याचा उपक्रम केला. ही माहिती घ्यायची तर ती इथल्यास सुशिक्षित, चौकस व जाणत्या माणसांकडून करून घेतली पाहिजे. यासाठी या अधिकाऱ्यांनी शास्त्री-पंडित, मुल्ला-मौलवी, कायस्थ व मुन्शी अशा जमातीतील बहुश्रुत व ज्ञानी लोक गोळा केले आणि त्यांच्याकरवी येथील पोथ्या, जुने न्यायनिवाडे, कागदपत्रे अशातून माहिती जमा करून त्यांचे सुटसुटीत सारग्रंथ तयार करून घेतले. आज ज्या 'सभारंजनी' नावाच्या पुस्तकाची माहिती घ्यावयाची आहे, तो एक असाच सार ग्रंथ आहे.

– २ –

'सभारंजनी' या पुस्तकाचा उल्लेख प्रो. द.वा. पोतदार (त्या वेळी ते म.म. या पदवीने विभूषित झालेले नव्हते.) यांच्या 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' या पुस्तकात आढळतो.[१] पोतदार लिहितात की, सातारा येथील छत्रपती प्रतापसिंह महाराज यांचे 'सावलीत काही मराठी लेखक प्रसन्नपणे लिखाण करीत होते. अशा लेखकांपैकी माधवराव मुन्शी म्हणून एक होता. त्याने १८१८ ते १८३९ या मुदतीत केव्हा तरी 'सभारंजनी' नामक एक ग्रंथ लिहिला तो 'भारतवर्ष' मासिकातून छापून प्रसिद्ध झाला आहे.'

'भारतवर्ष' हे मासिक दत्तात्रय बळवंत पारसनीस (१८७०-१९२६) व हरी नारायण आपटे (१८६४-१९१९) यांनी कार्तिक शके १८१८ मध्ये डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीच्या 'विद्यमाने' (म्हणजे या संस्थेचे थोडेफार आर्थिक सहाय्य घेऊन) सुरू केले. कार्तिक १८१८ ते अश्विन १८१९ या पहिल्या वर्षात ११ अंक प्रसिद्ध झाले. (शेवटचा अंक जोड अंक होता.) पहिल्या वर्षी या मासिकाचे प्रकाशक 'कुलकर्णी आणि मंडळी', पुणे, हे होते. (या मंडळीला हरी नारायण आपटे व गोविंदराव आणि काशीबाई कानिटकर हे दांपत्य पैसे पुरवीत असे.) यानंतर दोन वर्षांचा खंड पडून एप्रिल १८९९ ते मार्च १९०० या काळात ११ अंक प्रसिद्ध झाले. (शेवटचा अंक जोड अंक होता.) या वेळी मासिकाचे संपादक पारसनीस हे एकटेच होते व प्रकाशकही तेच होते.

शेवटच्या अंकाच्या मलपृष्ठावर 'शेवटचा निरोप' घेताना प्रकाशक लिहितात, 'मराठ्यांच्या इतिहासाचे जुने कागदपत्र प्रसिद्ध करण्याकरिता 'काव्येतिहास संग्रहा'नंतर दुसरे काही साधन नसल्यामुळे डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीच्या थोड्याशा आश्रयाने 'भारतवर्ष' मासिक-पुस्तक प्रसिध्द करण्यास आम्ही प्रारंभ केला होता. परंतु त्यास लोकांच्या उदार आश्रयाची वाण पडून खर्च भागेनासा झाल्यामुळे व प्रसिद्ध पुस्तकाचा नियमितपणा राहाण्यास इतर आवश्यक गोष्टींचे आनुकूल्य न जमल्यामुळे आम्हास दोन वर्षांच्या अनुभवाने 'भारतवर्ष' मासिक-पुस्तक तूर्त बंद करणे भाग पडले आहे, हे कळविण्यास फार दुःख वाटते!'

या मासिकाच्या डिसेंबर १८९९ व जानेवारी १९०० या अंकात मिळून १०६ पानांचे हे 'सभारंजनी' पुस्तक प्रसिद्ध झाले आहे. या पुस्तकाच्या प्रस्तावनेत 'भारतवर्ष'कार म्हणतात की, ' "सभारंजनी" नामक पुस्तक रूपाने लिहिलेले एक हिंदुस्थानचे वर्णन आम्हास सातारा येथील छत्रपतींच्या पदरच्या एका जुन्या घराण्याकडुन मिळाले... "आरायेष महफील" हा (ग्रंथ) शेरअल्ली नामक एका मुसलमान गृहस्थाने मिस्ट्र हरनगटन (हॅरिंग्टन?) नामक एका युरोपियन गृहस्थाच्या सांगण्यावरून इ.स. १८०४ मध्ये लिहिलेला आहे' 'आरायेष महफील' चे मराठी भाषांतर माधवराव मुन्शी याने केले. भाषांतराच्या प्रस्तावनेत माधवराव मुन्शी लिहितो, 'श्रीमत् जगदीश्वराप्रती नमन करून ग्रंथ लिहिण्यास प्रारंभ करितो की, पूर्वी हा ग्रंथ साहेब आलिबान मिस्तर हरनगटन साहेब बहादूर यांनी शेरअल्ली मुन्शी याजकडून उडदू भाषेत करवून याचे नाव 'आरायेष महफील' असे ठेवून सन १८०४ या सालात छापखान्यात देऊन छापविला; परंतु जे लोक फारसी विद्येत प्रवीण नाहीत त्यांचे समजुतीस येत नाही. याजकरिता प्रवृत्तींचे मराठी भाषेत तरजुमा केला असता इकडील लोकांचे

समजुतीत चांगला येईल, म्हणोन श्रीमन्महाराज क्षत्रिय कुलावंतांस राजश्री छत्रपती स्वामी यांणी आज्ञा केल्यावरून माधवराव मुन्शी याने त्यातील सार अर्थ काढून या पोथीची योजना करून इचे नाव 'सभारंजनी' असे ठेविले'.

'आरायेष महफिल' या फारसी शब्दप्रयोगाचे 'सभारंजनी' हे चपखल भाषांतर आहे. पोक्त, बहुश्रुत व सुज्ञ माणसांच्या बैठकीत सांगितलेली माहिती असे 'सभारंजनी'चे स्वरूप आहे. मोंगल बादशाहीतील वीस सुभ्यांची माहिती यात प्रथम आली आहे. प्रत्येक सुभ्याला एक प्रकरण अशी वाटणी इथे आहे. सुभ्यातील मुख्य शहरे, नद्या, उत्पादने, धार्मिक स्थळे अशांची माहिती शेर-अल्ली देतोच पण त्या सुभ्याचा थोडका इतिहास व महसुली उत्पन्न हेही देतो. पुस्तकाच्या दुसऱ्या भागात पांडवांपासून पृथ्वीराजापर्यंतच्या हिंदुस्थानातील राजांच्या हकीकती दिल्या आहेत. महाभारत, पुराणे, राजतरंगिणी व अकबरनामा या ग्रंथांवरून संकलित करून ही माहिती दिली आहे.

– ३ –

'सभारंजनी' चा मूळ कर्ता शेरअल्ली हा मुसलमान आहे व हॅरिंग्टन नावाच्या निखालस परकीय मनुष्याच्या पदरी तो नोकर म्हणून आहे. असे असले तरी 'हिंदुस्थानियत' असे ज्याला म्हणता येईल असा अभिमान त्याने अंगी बाणवलेला दिसतो. कारण जात, धर्म, प्रांत यांच्या पलीकडे जाऊन या देशाविषयी व इथल्या सर्वसमाविष्ट समाजाविषयी त्याला वाटणारी आपुलकी व काहीशी आढ्यता देखील त्याच्या लिहिण्यातून डोकावते. याचा अर्थ असा नाही की, जात किंवा धर्म यातील भेदांची नोंद तो घेत नाही; पण या नाना प्रकारच्या लोकांच्या सहजीवनातून काही एक एक-सारता निर्माण झाली आहे, अशी जाणीव हे पुस्तक वाचताना भासत राहाते.

पुस्तकाच्या सुरूवातीलाच तो सांगतो,[३] 'कोणताही देश याचे वसाहतीस बरोबर होऊ शकत नाही. कारण या देशात जागजागा हर एक विद्येत कुशल माणसे फार, आणि जागजागा विहिरी व तळी व धर्मशाळा व बागा व झाडे छायेकरिता वाटेवरील लाविली आहेत. आणि ऋतुपरत्वे नाना प्रकारचे पोशाक व नाना प्रकारच्या खाण्याच्या वस्तु, मेवा-मिठाई, फळफळावळ सुद्धा व जागोजाग किल्ले व देवळे व मशिदी; आणि नदी-नाले अक्षय वाहतात व हर एक जागा नावा व ठोकरे वगैरे उतरण्याकरीता तयार आहेत.... यामुळे देश-देशाचे सोदागर तऱ्हेतऱ्हेचे माल घेऊन येतात व जातात व मुशाफरही सुखेनैव मुशाफरी करतात'. (१)

आपण इतिहासात वाचतो की, १८व्या शतकाच्या अखेरीला देशभर फार मोठी अव्यवस्था माजून बजबजपुरी झाली होती. ठग, पेंढारी, लुटारू व निरनिराळ्या स्थानिक-दांडग्या लोकांची सैन्ये प्रजेला बुचाडीत होती. व्यापार बंद पडला होता. प्रवास धोक्याचा होता. पण या सर्व अंदाधुंदीचा क्षीणसा पडसादही वरील वर्णनात आढळून येत नाही, हे आश्चर्य नव्हे काय?

येथील समाजाविषयी शेरअली म्हणतो की, 'या हिंदुस्थानचे सर्व लोक हिंदू अगर मुसलमान निर्मळ राहतात. खाणे, पिणे व पोशाक चांगले, सदैव हसतमुख, स्नेहास चांगले मिळणसार व नैष्ठिक, कायम मिजास व साहेब-इन्साफ-वाले, मोठे हिंमतवाले, तसेच सावकार लोक बहुत प्रामाणिक, इतबारी, विश्वासू व त्याच प्रकारे शिपाईलोकही भले माणूस, शूर, एकनिष्ठपणे इमाने इतबारे चाकरीत हजर राहणार.... या देशातील स्त्रिया बहुत लावण्य, नेटक्या, पतिव्रत धर्मे करून युक्त, भर्ताराशी परम प्रीतीने अनुसरून असतात. एक क्षण वियोग साहत नाहीत. दैवदशे भर्ता मरण पावला तर सहगमन करतात. अथवा सर्व उपभोगादी वर्ज करून शरीर शोषवून देह ठेवितात. याच प्रमाणे मुसलमान लोकातही हाच प्रकार वागतो. त्या लोकात दुसरा भर्ता करावा अशी त्याचे मार्गस्थापकाची आज्ञा आहे. परंतु हिंदुस्थानचे मुसलमान करीत नाहीत. ते व्यभिचार समजतात.... या देशातील लोकांची तारीफ जितकी केली तितकी थोडीच, आणि शोभेल. याज करीता इतर देशातील लोक या देशात येऊन राहाण्याची इच्छा करितात'.[७]

येथे आपणास एक गोष्ट दिसते ती अशी की, पुढील काळातील विचारवंत इंग्रजी समाजाशी आपल्या समाजाची तुलना करून आपल्या दोषांचे उद्घाटन करू लागले तशा तऱ्हेचा कोणताही आत्मनिंदेचा प्रकार, तो स्वत: हर्टिंगटन या इंग्रजाचा आश्रित असूनही, शेरअल्लीच्या लिखाणात दिसत नाही. उलट 'याज करिता इतर देशातील लोक या देशात येऊन राहाण्याची इच्छा करतात', असे लिहिताना इंग्रज हे या देशात पोटभरू म्हणून आले आहेत, असा खोचक शेरा त्याला मारावयाचा असावा. इंग्रजांकडे हिंदी समाज त्या संक्रमण काळात कोणत्या दृष्टीने पाहात होता याची ही एक चुणूक आहे.








मोंगल साम्राज्यातील सुभ्यांची माहिती शेरअल्ली देतो. तो सांगतो की, देशात वीस सुभे आहेत, एकशे नव्वद जिल्हे (सरकारे) आहेत व चार हजार दोन तालुके (महाल) आहेत. सर्व हिंदुस्थानचे (म्हणजे मोंगल अंमलातील मुलखाचे) वसुली उत्पन्न आठ अब्ज, आठ कोटी, आठ लाख, ऐंशी हजार पाचशे त्र्याऐंशी दाम आहे, असे तो सांगतो. तीन दामांचा एक रुपया होतो. इथे हे पुनः सांगणे जरूर आहे की, या मुलखात महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र, तामिळनाडु यांची गणती शेरअल्ली करीत नाही. पण ठठ्ठा, काबूल, मुलतान यांना तो हिंदुस्थानातच धरतो.

– ४ –

शेरअल्ली याचा चमत्कारावर विश्वास आहे. हिंदुस्थानात मुसलमानी अवलियांचे दर्गे ठिकठिकाणी आहेत व त्या त्या स्थळी त्या अवलियांनी केलेल्या चमत्कारांच्या हकिकती प्रसिद्ध आहे. त्या चमत्कारांची नोंद घेतल्याखेरीज शेरअल्ली पुढे जात नाही. उदा. 'भालोच' नावाच्या गावात सुलतान सखर नावाच्या अवलियाची कबर आहे. 'हेहि मोठे करामती – कोणी एक सौदागर उंट भरून घेऊन जात होता. एका उंटाचा पाय मोडला. तो सौदागर चिन्ताक्रान्त होऊन या बुजुर्गाचे कबरेपाशी येऊन नवस केला की, माझा उंट बरा व्हावा. तेव्हा त्याचे निश्चयाचे बळे व कबरेचे करामतीने उंटाचा पाय जुडून गेला. (४८)

शेख फरीद या अवलियाविषयी तो लिहितो, 'याची करामत मोठी. मातीच्या ढिगाकडेस पाहिले तो ढीग साखर झाला. या क्रियेकरून त्याचे नाव शेख फरीद शकरगंज असे झाले. (४८)

'बेपालडाल त्यात शहा शमखुद्दीन दरभाई याची दरगाह आहे. हा मोठा करामती होता.... एक हिंदू देपाली या नावेकरून होता. तो या फकिराचे सेवेत हजर रहात असे. एके दिवशी काही हिंदुलोकांचा पर्व-काल होता. ते लोक गंगास्नानास चालले. देपाली यानेही फकिरास निरोप मागितला. तो फकिरांनी अशी आज्ञा केली की, ज्या दिवशी तो दिवस असेल, ते वेळेस मला स्मरण दे. तो दिवस प्राप्त झाला तेव्हा देपालीने फकिरास अर्ज केला की, तो दिवस आज आहे. हे ऐकून बोलले जे तू आपले डोळे झाक. त्याने नेत्र लाविताच गंगेचे काठी पोचला. वरकड जे गावचे लोक यात्रेस गेले होते त्यांसी भेटला. त्यांचे बरोबर येथील स्नानदानादि जो विधी होता तो करून मागती डोळे लाविले. तो आपले गावी त्या गुरूपाशी पोहचला. (५३)

शेरअलल्ली हा हल्लीच्या भाषेत बोलायचे तर 'सर्वधर्मसम-भाववादी' आहे. पवित्र स्थळ किंवा साधुपुरुष कोणंत्याही धर्माचा असो, त्याच्या चमत्कारावर तो विश्वास ठेवतो. प्रयाग येथील अक्षय-वटाविषयी तो लिहितो, '... जहांगीर बादशहा याने त्या झाडास तोडवून एक तवा लोखंडाचा मोठा भारी करवून त्या झाडाचे जागी ठेवला. काही दिवसांनी ते झाड प्रफुल्लित होऊन तवा फोडून बाहीर निघाले. हिंदुलोक त्या स्थानास तीर्थराज म्हणत आहेत.' (१८)

गुरू नानक यांची माहिती शेरअल्लीने अशी दिली आहे. 'पटाल्याहून बारा कोसावर बाबा नानक याचे संस्थान आहे. अलमगिराचे वेळे पर्यंत त्याची अवलाद तेथेच रहात होती. तो योगी मोठा तपस्वी धर्मात्मा होता. करामतही मोठी होती. शीख लोक त्याचेच पंथातील व नानकपंथी उदासी फकीर याजपासूनच झाले. शके १५३६ विक्रम शकात तलवडीत जन्म झाला. सन ८९४ हिजरी साल होते. हा सिद्ध धाकटेपणा-पासून सिद्ध होता. करामती चमत्कारास येत होत्या. काही दिवस देशाटन करून पटाल्यास आला. तेथे लग्न झाले... शेवटी वैकुंठवासात गेला. पुढे पुत्रही सुपुत्र होता. परंतु त्यास आपले ठिकाणी स्थापिले नाही.'. (५४)

शेरअल्ली अवलियांच्या चमत्कारांच्या गोष्टी सांगतो. त्याप्रमाणे निसर्गातील आश्चर्यांच्या गोष्टीही सांगतो. हिंदुस्थानातील निसर्ग हा विविध आश्चर्यांनी नटलेला आहे, समृद्ध आहे व मनुष्याच्या उपभोगाच्या साधनांनी संपन्न आहे, असे तो श्रोतृजनांच्या मनावर ठसवू पाहतो.

'नगरकोटा (पंजाब) हून दोन कोसांवर ज्वालामुखी ठिकाण आहे. तेथे कित्येक जागी ज्वाला निघतात. तेथे हिंदुलोक बहुत येतात. पूजा करून तऱ्हेतऱ्हेच्या वस्तु त्या जाळात टाकून जाळितात.' (५५) 'सैदसागर दवबीमध्ये मिठाचे दगड निघतात. बलकी तमाम पहाडच मिठाचाच आहे. त्या पहाडाची लांबी शंभर कोस काही अधिकच.... ते मीठ काढणारे लोक. त्यांचे नाव लाशाकस.... ते नागवे उघडे खांद्यावर कुदळी घेऊन त्या अंधाऱ्या सुरंगातून जाऊन दोन तीन मणाच्या मिठाच्या ठेपा काढून आणतात.... प्रतिवर्षी किती लाख रूपयांचे मीठ निघते... तेथील कारागीर लोक मिठाची बासने करून विकतात. त्याचे जवळच दुधीया दगडाची खाण आहे. त्याचा चुना होतो व बासनेही होतात.' (५८)

'कश्चित ठिकाणी बयाह व भट या नदीची वाळू काठावर धुतलीं तर सोने सापडते व उत्तरेकडील पहाडावर रूपे व तांबे व जस्त यांची खाण आहे'. (६२)

'लाडकी (काश्मिर सुभा) चे उत्तरेस एक मोठा उंच पहाड आहे. त्याचे माचीस दोन विहिरे. एक उष्ण अतिशय व एक बहुत शीतल. त्यास अंतर दोन गज'. (६५) 'तेथे (काश्मीरमध्ये) मधुमती म्हणोन एक नदी... आली आहे. त्या नदीच्या काठी बसून वाळू वेगळी काढून धुतली तर सोन्याने मुठी भरून जातात.' (६६)

– ५ –

ठिकठिकाणची पिके, मेवे, फळफळावळ, नाना तऱ्हेची कलाकुसरीची किंवा उपयोगी उत्पादने यांची वर्णने शेरअल्ली रंगून जाऊन करतो. हा देश अतिशय श्रीमंत आहे; वैविध्याने नटलेला आहे; पहाड, नद्या, दऱ्याखोरी, विस्तृत मैदाने अशा नाना प्रकारच्या जमिनीतुन इथली माणसे वेगवेगळी भरघोस पिके काढतात हे लोकावर बिंबवण्याचा त्याचा प्रयत्न असतो.

'मिनपूर येथे बारा हजार बिघे जमीन केशराची शेते होण्याची आहे. तेथे वैशाख अखेरीपासुन आडते जोडितात. ते एक महिना ज्येष्ठ अखेरीपर्यंत शेताची मेहनत करून केशराचे गड्डे त्यात लावितात. एका महिन्याने उगवतात. कार्तिक अखेरपर्यंत वाढते. एक वीतवीत झाड उंच होत नाही. नंतर फुले उगवावयास लागतात. हर एक झाडास आठ आठ फुले व एका एका फुलात सहा सहा फकड्या असतात. फुलाचा रंग उदावरते असतो. आत दर फकडीत तीन तार पिवळे व तीन तार लाल निघतात. त्याचे केशर होते.' (६३)

कच्छ विषयी तो लिहितो, 'उंट बहुत उत्पन्न होतात. तशीच बकरीही. या खेरीज ताजी घोडे तेथील प्रसिद्ध आहेत... व्याघ्रादिक जनावर या रानात आहेत. तत्राप चित्ते फार आहेत. शिकारी लोक शेकडो धरून नेतात. हत्तीही चांगले निपजतात. किंमतीस भारी व डौलास उत्तम. शरीरे करून पुष्ठ व चालणार एका दिवसात पन्नास कोस चालतात. परंतु थकावयाचा नाही.' (४५)

'कसबे सांभर एक ठिकाण आहे. तेथे सामरी मीठ होते हे प्रसिद्ध आहे. शहरापासून जवळ चार कोस लांब व कोसभर रूंद तळे आहे. त्याचे पाणी खारे. मीठ होण्याची तजबिज अशी करतात जे, जमीन खोदून त्यात तळ्याचे पाणी भरतात. ते भूईस आटले म्हणजे त्या जागी तमाम मीठच तयार होते.... किती लक्ष रूपयाचे मीठ बेपारी विकतात आणि महसूल सरकारास देतात. (४१)

महाराष्ट्र काही मोंगलीचा सुभा नव्हे. पण त्याचे मराठवाडा, खानदेश व वऱ्हाड हे भाग मोंगलांचे सुभे म्हणून धरले जात. मराठवाड्याविषयी शेरअल्ली सांगतो, 'तेथील हवा फार चांगली. अक्षयी वसंतऋतुप्रमाणे आहे. इमारती अति उत्तम. पाऊस मिथुन संक्रांतीपासून कन्यासंक्रांतीपर्यंत पडतो. फळे व पुष्पे चांगली. धान्याचा सुकाळ अक्षयी असतो. कापडही हरतऱ्हेचे व जवाहीर आदी किंमतीचे पाहिजेल तेव्हा सिद्ध. मेवे जिन्नस जिनसीचे हर एक मुलखात मिळतात.' (३७) 'सुभे खानदेश दारूल खलाफत बऱ्हाणपूर तपती नदीचे काठावर वसले आहे. लांबरूंद मोठे व आबादीही पुष्कळ. कारागीर लोक फार राहतात. शहराचे आसपास बागात फार. मेवे तऱ्हेतऱ्हेचे बहुत. पर्जन्यकाळी चिखल फार होतो. ज्वारी बहुत पिकती. साळीचे पीक होत नाही. परंतु देशावरून तांदूळ फार चांगले येतात. कापड मोठे व बारीक होते. त्यातही इलायच्या व सरसाफ तेथील फार चांगला होतो.' (३८) इलायच्या म्हणजे गर्भरेशमी कापड आणि सरसाफ म्हणजे डोक्याला गुंडाळावयाचा रुमाल किंवा फेटा.

पटण्याच्या सुभ्याविषयी शेरअल्ली माहिती देतो की, 'मेवे ज्यात फार होतात त्यात अनार बहुत चांगला मोठा व त्यातील दाणे मोठे मोठे रसाळ, गोडीस विशेष होतो. पांघरूणे उपरी या सुभ्यात विणली जात आहेत. पक्षी जातीत रावे रंगबिरंगी बहुत चांगले उत्पन्न होतात. जर कोणी त्यास पाळून शिकविले तर जलद बोलतो.... तेथून (गयेपासून) जवळच संगमरवरीची खाण आहे. बहुत कारीगार लोक त्या दगडाची बसने व गहना करून आपली कुशलता दाखवितात. इतका बारीक कागदही कातरता येणार नाही असे खोदितात' (२४) बसन म्हणजे चौरस पाट व गहना म्हणजे दागिना.

'दिल्लीपासून उत्तरेस चाळीस कोसावर संभळ म्हणोन कदीम वस्ती आहे... त्याचे उत्तरेस कमाऊचा पहाड आहे. तेथे सोने, रूपे, तांबे, शिसे, लोखंड, गंधक व टाकणखार इतक्या खाणी आहेत. बाज व शाहीन वगैरे शिकारी मारणार पाखरे उमदे किंमतीची तेथेच पैदा होतात. आणि कस्तुरीमृग व रेशमी किडे याच ठिकाणी आहेत व पांढरा मध बहुत उत्पन्न होत असतो.' (११)



अनुक्रमणिका

- ५ -

शेरअल्ली धर्माने मुसलमान. तो माहिती ज्या मुलखाची देतो आहे तो मुलूख मोंगलांच्या म्हणजे मुसलमान राज्यकर्त्यांच्या ताब्यातील. तथापि त्याच्या लिखाणात कोठेही हिंदूंविषयी अनुदार भाषा आढळत नाही. अवरंगजेबाने हिंदूची देवळे मोडून मशिदी बांधल्या याची तटस्थ नोंद तो घेतो. 'मुख्यत्वे करून विश्वेश्वर देव. त्याचे देऊळ मोठे होते. ते अलमगीराने मोडून त्या जाग्यावर एक मोठी मशीद बांधली आहे. तेथील राहणार लोक त्या मशिदीस विश्वेश्वराची मशीद म्हणतात.' (१९) 'मथुरा ही कदीम वस्ती यमुनेचे काठी आहे. येथे कृष्णाचा जन्म झाला... ही हिंदुलोकांचे पूज्यस्थान आहे. केशवराज म्हणोन एक देव होता. तो अलमगीर याणे मोडून त्या जाग्यावर मशीद बांधली आहे.' (१५) मात्र अयोध्येतील देऊळ पाडून किंवा रामाच्या जन्मस्थानी, मशीद बांधल्याचा उल्लेख शेरअल्ली करीत नाही. (२१)

पुस्तकाचे सुरूवातीस शेरअल्लीने हिंदूंच्या विद्यांवर ३४ पाने मजकूर लिहिला आहे. त्यात वेद, उपनिषदे, सहा शास्त्रे, अठरा पुराणे यांची त्रोटक माहिती दिली आहे. चार वर्ण व चार आश्रम यांचाही उल्लेख केला आहे.

पुस्तकाचे अखेरीला पांडवांपासून पिथोरापर्यंत, म्हणजे पृथ्वीराज चौहान याच्यापर्यंत, जे राजे होऊन गेले त्यांची माहिती दिली आहे. त्यात महाभारताची कथाही आली आहे. मूळ उर्दूतून मराठीत भाषांतर केल्यामुळे काही वाक्ये चमत्कारिक झाली आहे. उदा. पराशर ऋषींनी सत्यवतीशी संबंध केला ही हकीकत सांगताना असे वाक्य येते : 'तो एके दिवशी पराशर बिन शक्ती बिन वसिष्ठ हा मोठा तपस्वी तेथे येऊन पार उतरावयास लागला.' (७९) किंवा 'सर्पाचे सत्र मवकुफ करविले'. (८४).

'राजा पिथोर याशी सुलतान शहाबुद्दिन गोरी सात वेळ लढला. परंतु मोडच होत गेला. असे असूनही हिंदुस्थानाची बादशहात घेण्याच्या तजविजीत राहात असे.' (१०५) यानंतर पिथोर व जैचंद यांच्यातील वितुष्टाची हकीकत देऊन शेरअल्ली सांगतो, 'ही खबर सुलतान गोरीस समजताच त्याने राजा जेचंदाशी स्नेह वाढविला.... मोठे जमीयतीनिशी मुलूख घेण्याकरीता दिल्ली कडेस निघता झाला... सुलतान शहाबुद्दिन पिथोरास धरून कैद करून गजनीस घेऊन गेला' (१०६) नंतर एक दिवस शहाबुद्दिनाने पिथोराच्या तिरंदाजीची करामत पाहाण्यासाठी त्याचे हाती तीर-कमान दिली. तेव्हा पिथोराने बादशहासच तीर मारून 'बादशहाचे काम पुरेच केले' (१०६) बादशहाच्या नोकरांनी पिथोरास मारून टाकले.

पुस्तकाच्या उपसंहारात शेरअल्ली लिहितो.

'पिथोरा मारला गेल्यापासून हिंदुस्थानची बादशहात हिंदूंचे खानदानातून गेली. मुसलमान बादशहाचे खानदानात पडली. युधिष्ठिरापासुन पिथोरापर्यंत एकशेवीस पुरूष चार हजार चारशे आठ वर्षे पर्यंत हिंदूचे बादशहात झाले. त्यात पिथोराने एकुणपन्नास वर्षे सलतनत केली. शेवटी देहांत झाला. ईश्वरे या सृष्टीमध्ये कोणी एकही चिरंजीव केला नाही. आणि सार्वभौमत्वही एकाच जातीत मुकरर केले नाही. जो जन्मला त्यास मरण आहेच. तशीच दौलत, रियासत एका खानदानातून दुसऱ्या खानदानास जाती. याजकरिता ज्ञानवंतांनी ऐश्वर्यास शाश्वत मानू नये, आणि आयुष्य क्षणिक म्हणून याचा भरंवसा धरू नये.' (१०६)

तर अशी ही 'आरायेष महफील' किंवा 'सभारंजनी'. एका जाणत्या व बहुश्रुत मनुष्याने घेतलेला हिंदुस्थानाच्या सद्यःस्थितीचा इंग्रजी राजवटीच्या सुरूवातीस घेतलेला आढावा. त्यात त्याने कोठेही इथल्या समाजाकडे कमीपणा घेतलेला नाही. हिंदु-मुसलमान असा काही भेदभाव दर्शविलेला नाही. दोन्ही धर्मातल्या लोकांचे सहजीवन बहुत काळ चालून एक हिंदुस्थानियत निर्माण झाली आहे, असा विश्वास त्याच्या लिखाणात दिसतो. इंग्रजांची त्याला माहिती आहे. कलकत्त्याचे वर्णन तो देतो. इंग्रजांकडे राज्यकारभार गेला आहे, हे त्याने पाहिले आहे. मोंगलबादशाहीच्या कारभाराची घडी इंग्रज बसवून देतील असा भरंवसा तो बाळगतो. पण हे कोणी ईश्वराने पाठविलेले वरच्या प्रतीचे लोक आहेत; यांचे ज्ञान, वर्तणूक, कारभाराची हातोटी काही निराळी आहे; यांची शस्त्रास्त्रे वरच्या दर्जाची असुन येथील सत्ताधीशांना ते भारी आहेत असा पुसटसा ध्वनीही या मजकुरात कोठे नाही.

तळटीपा - १) पान २४९ (१). २) उपोद्घात, पान २ (२). ३) कंसातील आकडे 'भारतवर्षा'तील पानांचे आहेत. पुस्तक जरी दोन अंकात प्रसिद्ध झाले आहे, तरी पानांचे आकडे ओळीने दिले आहेत.

आधारग्रंथ - १) मराठी रियासत (खंड ८ वा), गोविंद सखाराम सरदेसाई, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९२. २) मराठी गद्याचा इंग्रजी अवतार, प्रो. दत्तो वामन पोतदार, ए.पी. बापट ॲण्ड ब्रदर्स, पुणे, १९२२.

**







अनुक्रमणिका

# भांडवलशाही आणि भारताचे भवितव्य

ग.रा. पटवर्धन

**भांडवलशाहीविषयी चार शब्द**

भांडवलशाहीचा कसून अभ्यास केला तो तीन जर्मन विचारवंतानी – कार्ल मार्क्स, वेर्नर सोम्बार्ट आणि मॅक्स वेलर. सोम्बार्ट याने भांडवलशाहीचा उदय, वाढ, व पक्वता असे तीन भाग पाडले, व प्रत्येक भागासाठी तीन-तीन शतके वाटून दिली. इ.स. १२-१३-१४, इ.स. १५-१६-१७ आणि इ.स. १८-१९-२०. युरोप खंडात ती उदय पावली याला कारण जमिनीची लोकसंख्येच्या मानाने विपुलता, व शेतीची शलगम/भोपळा (टर्निप) पिकवल्याने वाढलेली उत्पादकता. या उत्पादकतेतील वाढीचे महत्त्व अर्थशास्त्रज्ञ केनेथ बुल्डींग यांनी विशद केले आहे. आशिया खंडातील नद्यांची खोरी सुपीक होती. पण दर एकरी काही शिल्लक राहात नव्हती, व लोकसंख्येचा भार वाढत होता. पिकाऊ जमिनीप्रमाणे दुसरे एक कारण म्हणजे जलमार्गाने होणारी वाहतुक. खुष्कीच्या वाहतुकीपेक्षा जलमार्गाने होणारे दळणवळण बाजारपेठा वाढवत नेत होते. बाजारपेठ वाढली की, श्रमविभागणी सुलभ होई. भूमध्यसमुद्र व अटलांटिक समुद्र यातून संचार करून युरोपखंडाला बाजारपेठा धुंडाळता येत असत. अशा रीतीने जमीन व पाणी या नैसर्गिक संपत्तीचा उपयोग प्रभावीपणे झाला. स्वावलंबन व स्वयंपूर्णता यांच्यापेक्षा भांडवलाचा उपयोग उत्पादकता वाढवण्यात नफा (फायदा) देतो हे युरोपिअन ख्रिश्चन लोकांच्या लक्षांत आले. सरंजामशाही भांडवलशाहीपुढे निष्प्रभ झाली. युरोपमध्ये सर्वत्र भांडवलशाही प्रस्तापित झाली असे नव्हे. १७व्या शतकाच्या अखेरीस स्पेन, पोर्तुगाल, हॉलंड व इंग्लड ही राष्ट्रे अग्रेसर होती. पण त्यानंतरच्या काळात इंग्लडने जगभर अंमल करण्यात भांडवलशाहीची मदत झाली. जॉन हिक्स या अर्थशास्त्रज्ञाने बाजारपेठांच्या आधाराने आर्थिक इतिहासाचे एक शास्त्रच मांडले आहे. पण सोम्बार्ट याने भांडवलशाहीत रुतलेले दोषही दाखवले आहेत. भांडवलशाही सेंद्रिय (ऑर्गनिक) न राहता अ-सेंद्रिय (इन-ऑरगॅनिक) साधनांवर अवलंबून राहू लागली. त्याचप्रमाणे नफा देईल ते नीति-दृष्ट्या योग्य ही धारणा बनली. दुर्बल राष्ट्रांची लूट करायची ही वसाहतवादी अर्थनीती आकर्षक झाली.

इ.स.च्या पक्व भांडवलशाहीच्या तीनशे वर्षांत (१८-१९-२०) दोन महत्त्वाचे आर्थिक रीतिरिवाज रूढ झाले. एक म्हणजे खाजगी पतपेढ्या (बँका) पैसा हाताळू लागल्या. सरकारी चलनाचे महत्त्व कमी झाले. पैसा ॲसेट (रोकड संपत्ती) म्हणून कमी उपयोगी व आर्थिक व्यवहारांचे माध्यम म्हणून खूप उपयोगी ठरला. पतपेढ्या, स्विस बँकांप्रमाणे मालमत्ता सुरक्षित ठेवण्यासाठी भाडे घेण्याऐवजी, ठेवी स्वीकारून त्यावर व्याज देऊ लागल्या. खातेदारांना पैसा उचलण्यात ताबडतोबीचे वचन देऊ लागल्या. सर्व ठेवीदार एकाच वेळी पैसा मागत नाहीत ही गोष्ट अशा वचनाचा आधार असते हे उघड आहे. जादूगार जसा सात-आठ चेंडू हवेत उडवून दोन्ही हात झेलण्यासाठी वापरतो तशीच पतपेढ्या चलाखी दाखवतात. सोन्याचांदीच्या नाण्यांसाठी सरकारी टांगसाळींकडे जाण्याचे कारण उरले नाही, व कागदीचलन प्रचंड प्रमाणावर वापरात आले. पतपेढ्यांचे निरीक्षण व नियमन करण्यासाठी मध्यवर्ती बँका (रिझर्व्ह बँक) स्थापन झाल्या. रोकड पैसा म्हणून किती असावा (cash reserve ratio) म्हणजे एका वेळी किती चेंडू हवेत उडवावे - हे धोरण मध्यवर्ती बँक ठरवू लागली.

इ.स. च्या १८व्या, १९व्या व २०व्या शतकांत पक्व भांडवलशाहीने जगाच्या सर्व कानाकोपऱ्यांतून वर्चस्व स्थापन केले. अरण्ये, धातूंचे जमिनीखालील साठे यांचा विनाश करायला व त्वरित नफा कमावण्यास तिचे पाऊल अग्रेसर होते. यासाठी तिला निगम (कंपनी) या कायदेशीर व्यक्तींचा आधार व उपयोग झाला. एकाद्या कौटुंबिक मालकांची किंवा भागीदारी फर्मची जबाबदारी संपूर्ण व अबाधित राहत असे. पण निगमांची जबाबदारी सीमित व भागधारणापुरती असे. भोपाळच्या दूषित वायू प्रकरणात हे स्पष्टपणे दिसून आले. निगमांचा आणखी उपयोग म्हणजे त्यांची उतरंड (पिरॅमिड) बांधता येत असे. सार्वजनिक निगमांची संपत्ती, खरेदी-विक्रीचे व्यवहार, वार्षिक नफा-तोट्याचे विभाजन इत्यादी बाबी ठरविण्याचे हक्क काही मूठभर लोकांना मिळत, कारण अनेक भागधारक यांना त्यात







अनुक्रमणिका

रस नसे. कागदोपत्री 'मालक' असलेले भागधारक कळसूत्री बाहुल्यांप्रमाणे वागतात हे कायदेशीर सत्य होते.

भांडवलशाहीमुळे त्रस्त झालेले देश कुठला मार्ग चोखाळतील हे त्या त्या समाजाच्या इतिहासावर, मूल्यांवर, उद्योजकांवर अवलंबून राहील. भारतापुरता विचार करायचा झाला तर खालील शक्यता दिसून येतात. पहिली म्हणजे वर्गयुद्धातून रक्तरंजित क्रांती घडणे. १९४७ साली स्वतंत्र झाल्यावर बी.टी. रणदिवे यांनी ही शक्यता पडताळून पाहिली. तेव्हा जरी त्यांना यश मिळाले नाही तरी आजचे नक्षलवादी यशस्वी ठरू शकतात. दुसरी शक्यता म्हणजे 'विश्वस्त' संकल्पनेवर आधारित समता, व भोगांवर नैतिक नियंत्रण ठेवणारी रचना करणे. गांधी-विनोबा यांनी यावर भर दिला. ते यासाठी अहिंसक/धार्मिक वृत्तीवर विसंबून होते. तिसरी शक्यता म्हणजे बँका व सार्वजनिक निगम यांचे आर्थिक स्थान नष्ट करणारी प्रतिनिधिक (पार्लमेंटरी) लोकशाही अस्तित्वात आणणे. आपल्या मार्गातील अडथळे दूर करण्यासाठी समाजाला यांत्रिकी व तांत्रिकी ज्ञान-विज्ञानाची जोपासना करावी लागेल. प्रदूषण व भ्रष्टाचार यांना निपटून काढावे लागेलच. पण यासाठी झटणारा पक्ष सध्यातरी दिसत नाही.

२१ व्या शतकाच्या आरंभी भारताला एक अब्जाहून अधिक लोकांचा भार सोसावा लागत आहे. तेव्हा एखादी विधायक समाजरचना येण्याऐवजी अनागोंदी होणे असंभव नाही. अठराव्या शतकात भारतात अशी स्थिती आली होती पण इंग्रजी अंमलापुढे अराजक टिकले नाही. भारताचे भविष्य वर्तवणे फार कठीण आहे असे प्रस्तुत लेखकाला वाटते.

**








# पुस्तक परीक्षण

## ‘संमत’ - विचाराविषयी ‘सह’ मत

### ‘सहं’नी, या विषयी का लिहावं?

“श्री. विश्वनाथ खैरे यांचा संमतविचार आणि नवी भारतविद्या” या लेखनाला ग्रंथ किंवा पुस्तक म्हणण्याऐवजी पुस्तिका म्हणणेच योग्य ठरेल. एकूण ८ + ७८ = ८६ पृष्ठांचं हे लेखन आहे. परीक्षणासाठी मी वापरलेल्या शीर्षकात ज्या आद्याक्षरांनी लेखक महाराष्ट्रात ओळखले जातात ती वापरली आहेत. डॉ. स.ह. देशपांडे हे त्यांच्या अर्थशास्त्र व त्यासाठी पूरक असलेल्या समाजशास्त्र व राजनीतिशास्त्र या विषयांचे तलस्पर्शी अभ्यासक म्हणून विख्यात आहेत. भाषाशास्त्र हा त्यांचा फार मोठा अभ्यासाचा विषय आहे अशी त्यांचीही वल्गना नाही. तरीही मराठी ही मातृभाषा, के. अ.ग. मंगळूरकर यांचे संस्कृतचे एक चांगले विद्यार्थी, व आपल्या विषयातील निष्णाततेमुळं सहजच एखाद्या विषयावरील लेखनाचं परिशीलन कसं करावं याचं नैपुण्य त्यांचे ठिकाणी आहे. याचमुळे “सहं’ना या विषयावर लिहिण्याचा अधिकारच काय?” अशा प्रकारचा प्रश्न विचारण्याचं औद्धत्य कोणी करू नये.

### लेखक व लेखनविषय

पुस्तिका-लेखकाच्या बाबतीत जे खरं आहे ते ‘खैरे’ या लेखनविषय झालेल्या परिश्रमी, बुद्धिमान व व्यासंगी संशोधकाविषयीही तितकंच खरं आहे. मुख्य अभ्यासविषय व जीवनवृत्तीचे साधन अभियांत्रिकी-विद्या असणाऱ्या, उत्तम संस्कृतलेखनाची क्षमता सिद्ध केलेल्या, मराठी-भाषक, तमिळनाडूत अनेक वर्षं राहिल्यानं तमिळचा झालेला परिचय त्या भाषेचा भाषाशास्त्रदृष्ट्या अभ्यास करून ज्यांनी अधिक सघन करून घेतला असे लोकविद्येचे रसिक-जाणकार असणारे श्री. विश्वानाथ खैरे यांना मीही अनेक वर्षे ओळखतो. त्यांचं बहुतेक लेखन (जे मला त्यांच्याच स्नेहामुळं ‘भेट’ स्वरूपात मिळालं) मी आस्थेनं वाचलेलं आहे; त्यांची व्याख्यानं ऐकली आहेत. त्याचं एखादं व्याख्यान आयोजितही केलेलं आहे आणि त्यांचं ‘वेदातली गाणी’ हे पुस्तक भावल्यानं त्याविषयीच्या अभिप्रायाच्या लघुलेखाचं प्रकाशन करून वाचकांसाठी त्याचं वितरणही (विनामूल्य) केलं आहे. तोच लघुलेख *नवभारता*नेच नंतर प्रकाशित केला. तो वाचून ‘सहं’नी आवर्जून दूरध्वनीवरून त्यांचं समाधान व्यक्त केलं (त्यांचा मोठेपणा!) याचा मला आनंद आहे. (*नवभारत,* वर्ष ५५, अंक १०, १९९१, पृ. ३४-३७)

### स्निग्ध मतभेद

एकूण *नवभारत*, खैरे, ‘सह’ व मी असा एक स्नेहल परिवार आहे असं म्हणायला हरकत नसावी.

पण एखादी व्यक्ती मानार्ह व प्रिय असली तरी त्या व्यक्तीचे सर्वच विचार पटतात असं नाही. नेमकी तीच परिस्थिती माझी झाली आहे. ‘रविवार सकाळ’ आणि ‘नवभारत’ या दोहोंनीही हेच लेखन (‘सहं’ची पुस्तिका) नेमकं माझ्याकडेच परीक्षणासाठी पाठवावं, याला कोणता ‘योग’ म्हणायचा? आणि म्हणूनच या लेखनाचं परीक्षण इतरांकडूनही होऊन लेखकाला योग्य न्याय मिळावा अशी माझी प्रामाणिक इच्छा आहे.

### द्राविडी शब्दांचे आदान

तमिळ व इतरही (विशेषत: कन्नड व तेलुगु) या भाषांकडून मराठीत शेकड्यांनी शब्द स्वीकारले गेले आहेत हे आजवर प्रस्थापित म्हणून मानलेल्या अनेकांनी अनेक प्रकारे लेखन करून दाखवून दिले आहे. जागतिक स्तरावरील अभ्यासक बरो व एमेन्यू यांनी त्यांच्या ‘Dravidian Etymological Dictionary’ या कोशाच्या परिशिष्टात आसामी, गुजराथी इत्यादी इतर भारतीय प्रांतिक भाषांप्रमाणेच मराठीनं स्वीकारलेल्या द्राविडी शब्दांचीही यादी दिली आहे. मराठीनं तत्सम समजून स्वीकारलेले, अनेक मराठी शब्द मुळात द्राविडीतून संस्कृतात आले, हे दाखवणारी मोठी यादी T. Burrow यांनी Oxford Press ने छापलेल्या त्यांच्या The Sanskrit Language या पुस्तकाच्या परिशिष्टात दिली आहे. यादी भरपूर विस्तृत आहे. ‘इन्द्रमेखला’ हा शब्द ज्ञानेश्वरीत कन्नडमधून आला (के. मु.ग. पानसे, चित्रावशास्त्री गौरव ग्रंथ) हा एक लहान लेख होता. पण नुकताच “ज्ञानेश्वरकालीन मराठीवर






कन्नडचा प्रभाव" हा ४४९ पृष्ठांचा ग्रंथ शामाचार्य लोकापुरांनी प्रकाशित केला आहे. प्रा. डॉ. प्रमोद लाळे यांनी 'ज्ञानेश्वरीतील तेलुगु शब्द' यावर लेखन केलं आहे. तेव्हा तमिळ शब्दांत मराठी शब्दांचे मूळ शोधणं या पद्धतीला कोणी गैर म्हणू शकणार नाही. पण त्याचमुळं यात फार काही नवीन आहे असंही म्हणता येणार नाही. 'अडगुलं मडगुलं' याचा अर्थ उलगडल्यावर किंवा तो उलगडणं शक्य आहे व हे गीत म्हणजे एक अर्थहीन 'खुळखुळा' अशा स्वरूपाचं नाही हे कळल्यावर अनेकजण वेगवेगळ्या प्रमाणात प्रभावित होणं हे पूर्णपणाने स्वाभाविक असलं तरीही विलक्षण, अपूर्व असं यात काही आहे असं नाही. चोखोबाचा 'रस नोहे डोंगा' यातील 'डोंकु' हा 'वाकडा' या अर्थाचा द्राविडी शब्दच आहे. "कुणियलिक्के बरलिल्ला अंगळ डोंकु" ('नाचता येईना अंगण वाकडं') ही म्हण मराठीतून कन्नडमध्ये गेली की, मराठीनं कन्नडमधून स्वीकारली हे तपासायला हवं.

### द्राविडी मागील आर्य-शब्द

Horse या अर्थाचा 'अश्व' हा आर्य-भारतीय शब्द आहे. पण मराठीतील घोडा याचं मूळ असणारा 'घोटक' हा 'कुदुरे' (हिंदी कूदना) मात्र द्राविडी असं म्हणत असतांनाच त्या 'घोटक' वा 'कुदुरे' च्याही मागे पुन्हा 'घुत्र' (> घोड्ड - घोडा) हा आर्यशब्द असल्याचाही दावा होतो. (घुत्र > हुत्र > होत्र ⟶ 'शालिहोत्र' – अश्वविद्येवरील ग्रंथ). 'अरिशि' हा तमिळ शब्द हे खेरे सांगतात. यापुढे जाऊन या अरिचि (शि) शब्दावरूनच आंग्लीत Rice शब्द आल्याचं ऐकून आनंद होत असतांनाच 'अरिषि' हा ब्रीहि पासून म्हणजे आर्यशब्दातूनच झाल्याचं 'शुभ वर्तमान' आपल्या पर्यंत येऊन थडकतं. 'चोरावर मोरं' म्हणजे "A peacock on a thief" याला काय अर्थ आहे? विश्वनाथ नरवणे आपल्या म्हणींच्या कोशात 'चोर' म्हणजे तमिळमध्ये 'शिजवलेला भात' असा अर्थ देतात त्यावर 'मोरू' म्हणजे दही (अगदी क्वचित् 'ताक' ही.). म्हणजे भातावर दही/ताक हा अर्थ जुळतो. मराठी महिलांना 'अदमोरं' माहीत आहेच. अद [अर्ध. म्हणजे अर्ध दूध व मोरू (दही/ताक)] कन्नडमध्ये ताकासाठी 'मोसरू' असा शब्द येतो. पण 'चोर' हा संस्कृत 'चरू'चे रूप आहे, त्याचं काय? 'सरि' म्हणजे 'ठीक, योग्य' हा शब्द बहुतेक द्राविडी भाषेमध्ये आहे. तो द्राविडी-कुळातला आहे का? नाही. संस्कृत 'सदृश' 'सारखं' म्हणजे 'योग्य' ("सदृशीं भार्यामुपेयात्" – साजेलशी बायको पहावी.) 'असदृशम्' म्हणजे "अ-योग्य". या 'सदृश'चे पालि-प्राकृतात 'सरिक्ख' (सारखं), 'सदिस', अशी रूपं होतात. त्याचंच 'सरि' असे कन्नडमध्ये तर गुजराथीत 'सारो' (ठीक) अंत रूप होतं. आजही ऐन स्वयंपाकाच्या वेळी मिरची, कोथिंबीर, खोबरं, लसूण यांसारखा एखादा पदार्थ घरात नसल्यानं गृहिणीला कोपऱ्यापर्यन्त पारूसच जावं लागतं. अगदीच 'अवतार' नसावा म्हणून बिचारी आरशासमोर उभी राहून, 'पदर-निऱ्या' जरा ठीक करून, केसावरून अलगद कंगवा फिरवून पूर्ण 'वेणी घालणं' नाही तर थोडं 'सरसं' करून बाहेर जाते. थोडक्यात वरवर द्राविड-कुळातील वाटणारे अनेक शब्द थोडेसे घासल्यावर त्यांचा आतला आर्यस्तर प्रकट होऊ लागतो. अरंगेत्रम् (रंगभूमीवरील प्रथम आविष्कार) यातील अरंग<रंग, पोण<श्रोण<श्रावण असे तमिळ 'पोणम्' म्हणजे एकना दोन शेकडो शब्द दाखविता येतील.

### 'संमत' मानीवाचं 'तमसं' स्वरूप

खेरे आग्रही नाहीत. त्यांनी त्यांच्या दृष्टीतून 'संमत' हा 'विचार' मांडला आहे. तो 'सिद्धान्त' आहे असंही ते मानीत नाहीत. गंमत म्हणून की काय त्यांनी या मानीवाला 'संमत' म्हटलं असलं व त्याचा अर्थ संस्कृत-मराठी व तमिळ या भाषांमधला आंतरिक एकात्मतेचा ('सहं'-च्या भाषेत 'अभेद'). संबंध असा असला तरी त्यांना अभिप्रेत आहे तो मात्र व्युत्क्रम (उलटा क्रम) आहे. तमिळमधून मराठी व मराठी बोलींमधून उद्भ्रंशानं कृत्रिमरीत्या संस्कृत निर्माण झालं असं प्रतिपादन आहे. थोडक्यात संमत हे तमसं आहे. आता संस्कृत म्हणजे बोलीभाषांवर संस्कार करून धर्मकार्यासाठी साधलेली भाषा. त्याचप्रमाणं साहित्यात वापर करण्यासाठी मुळात मनात संस्कृत रूपं ठेवून प्राकृत व्याकरणांच्या नियमांचा अवलंब करून कृत्रिम प्राकृत हे केवळ साहित्यात वापरण्यासाठी निर्माण केलं असाही अभ्यासकांचा दावा आहे. आजवर प्रकृती म्हणजे 'मूळ' रूप व त्यावर संस्कार करून साधलेलं रूप म्हणजे संस्कृत हा एक पक्ष तर संस्कृत ही प्रकृती (मूळ) व प्रकृतीपासून 'अपभ्रंश' (एक 'विशिष्ट' प्राकृत नव्हे) रूपानं तयार झालेलं रूप ते प्राकृत येवढीच दोन मुख्य मतं होती. खेरे यांनी या दोहोंतच घुटमळणाऱ्यांच्या डोक्यात शर्विलक ज्याप्रमाणे दिवा विझवण्यासाठी एक 'आग्नेय' किडा सोडतो (मृच्छकटिक, तृतीय अंक) तसाच एक वैचारिक-मानीवाचा किडा सोडून

दिला आहे. जसा 'अप-भ्रंश' आपण समजू शकतो तसाच 'उद्-भ्रंश' समजून घ्यायचा असं खैरे म्हणतात. नाहीतरी पूर्वी राष्ट्रान्तरीय आर्थिक-परिभाषेत under-developed countries असा शब्दप्रयोग व्हायचाच. काही हुषार लोकांना हा 'युफेमिझम' कळला व अमुक तमुक 'दिवंगत', 'केलासवासी' वगैरे काहीही झालेला नसून तो चक्क 'मेला' आहे. हे त्यांना कळलं आणि ते उघड-उघड खरंच बोलू लागले. under-developed नाही पण undeveloped म्हटल्यानं (वाईट वाटू नये म्हणून 'developing nations' असं म्हणतात.) कालिदासाच्या भ्रंशरिक्तप्रकोष्ठः या मेघदूतातील वर्णनानं विचित्र कल्पना मनात ठाम रूतून मला भ्रंशाऐवजी खैरे सरळ सरळ 'उत्कर्षाचा' मार्ग का स्वीकारत नाहीत असा प्रश्न पडायचा.

राजकारणात राज्याच्या मुख्यमंत्र्याचा केन्द्रात 'उद्-भ्रंश' होऊ शकतो म्हणजेच kicked up हे कळू शकतं. खैरे यांनी मॅकडोनल यांचं वेदभाषाविषयक "ती लोकभाषा नसून कृत्रिम भाषा (पुरोहितांसाठी) निर्माण केलेली आहे" हे मत उद्धृत केलं आहे (पृ. ४२) आणि प्राकृतभाषाही प्रकृतीच्या म्हणजे साधारण जनांच्या खऱ्याखुऱ्या व्यवहारभाषा (vernaculars) नाहीत हे बॅशम याचं मतही उद्धृत केलेलं आहे. (पृ. ५१) हे दोघे एकंदरीत येवढ्या पुरतेच खरे मानायला हवेत असं खैरे यांच मत असावं. कारण त्यापुढे दोघेही "आर्य बाहेरून भारतात आले" व युरोभारतीय भाषेचं अस्तित्व व तिच्यापासून आर्य भारतीय भाषा निपजल्या असली मतं ठामपणं मांडतात. मलाही बॅशम व कीथ यांचं प्राकृतांविषयीचं मतही पटतं (नाटकातील स्त्री पात्रांची प्राकृतभाषा ही त्यांची – कन्नडमध्ये म्हणायचं तर 'मने-मातु' वा 'गृहभाषा' असती तर गद्यात शौरसेनी आणि पद्यात महाराष्ट्री असा प्रकार त्या का करत्या? थोडक्यात त्यांना असं करण्यास 'नाटक'कार भाग पाडतो!). पण खैरे यांना मॅकडॉनेलचे मत उद्धरणीय वाटलं याचं मात्र मला कोडं पडतं.

वेदातली सूक्तांची भाषा ही जर याज्ञिक पुरोहितांची भाषा असेल तर "वेद हे आद्य, भारतीय, लोकसाहित्य आहे" (वेदातील गाणी पृ. १) या खैरे यांच्या मेंदीव मानीवावर विसंबून स्व-प्रज्ञा गहाण टाकून म्यां 'अ-वास्तव-प्रशंसा' केली काय? सोनेरी झाकणानं सत्याचं तोंड झाकलं असतांना 'सोनसळ्या' सारख्या शब्दांची मोहिनी माझ्यावर पडली काय? (जिज्ञासूंनी नवभारत वर्ष ५५, अंक १, १०.१९९१ पृ. ३४-३७ यातील माझा लेख व त्यात उद्धृत केलेलं ओल्डेनबर्गचं "वेदकाव्य हे पुरोहितांचं, याज्ञिकांचं आहे" हे मत वाचावं).

**युरोभारतीय व आर्यभारतीय भाषांचा सिद्धान्त**

या संदर्भात मला अतिशय कळकळीनं सांगायचं आहे की प्रा. स.ह. देशपांडे यांनी वाल्ट पोकर्ण, के. डॉ. सुनीती कुमार चटुर्ज्या, पिशेल, बाबुराम सक्सेना, वॅकरनागेल, डॉ. रा.ना. दांडेकर, डॉ. कत्रे, डॉ. घाटगे, डॉ. मेहेंदळे या व अशाच शेकडो जगन्मान्य भाषाविशारदांच्या साहित्याचं त्यांनी ज्या आस्थेनं खैरे यांचं २००० पृष्ठांचं साहित्य वाचलं, त्या आस्थेनं वाचन करावं. मैत्रीचे बंधन, कौतुक, प्रेम मी जाणू शकतो. प्रा. कृ.श्री. अर्जुनवाडकर, प्रा. लीलाताई अर्जुनवाडकर यांनी खैरे यांच्यावर पुस्तक लिहिण्याच्या उपक्रमाबद्दल 'सहं'ना उत्तेजन दिलं (पृ. दहा) हे मी मानतो. या दोहोंचे गुरू के. प्रा. अरविंद मंगळूरकर यांनी त्यांच्या प्राध्यापकी कारकीर्दीत डेक्कन कॉलेजमध्ये जाऊन भाषाशास्त्राच्या शिबिरात शिकून आपल्या नोंदीच्या वह्या तयार केल्या. त्यांच्या बोलण्यात, लेखनात मला कुठंही युरो-भारतीय भाषेचा सिद्धान्त त्यांनी नाकारला, किमान तो तपासून घ्यायला हवा असंही विधान केल्याचं आठवत नाही. त्यांच्या संप्रदायातील अध्यापनात "आर्य पंजाबमध्ये येऊन ठेपले" अशाच आशयाचं प्रास्तविक व्याख्यान असे. इंग्रजीतील Stamina व संस्कृतातील 'स्थामन्' या शब्दांमधील भाषिक एकरूपता प्रा. सौ. लीलाताई अर्जुनवाडकर यांनी वर्गात सांगितल्याचे मला आठवतं (आणि ते खरंच आहे.) एकुण 'सह' यांनी त्यांचं आकलन व धारणा यांना धरून लिहावे येवढाच 'उत्तेजना'चा भाग असणार. उत्तेजन लेखनाला आहे. प्रतिपादनाला सर्वांशानं असणार नाही असं वाटतं. डॉ. रा.ना. दांडेकर यांनी संपादित केलेल्या "संस्कृतचा प्रादेशिक भाषांवरील प्रभाव" या ग्रंथात मंगळूरकर आणि श्री व सौ. अर्जुनवाडकर या त्रिकूटाचा एक लेख आहे. त्या लेखात लेखक-त्रयी स्पष्ट म्हणते. (व कोणाही समजंस भाषाभिज्ञाला पटेल असंच ते आहे.) "Marathi belongs to the group of Indo-Aryan Languages. As such Sanskrit is seen to have influenced Marathi in varieties of ways and forms, as it has done the other Indo-Aryan languages and even the Dravidian languages like Telugu, Malyalam, Kannad

and Tamil''. याबाबत फरक येवढाच की, द्राविडी भाषांचा निर्देश करताना मी तमिळला प्रथम स्थान दिले असतं आणि मल्याळमला शेवटचं. कन्नड व तेलुगु यांना मी कंसांकित (bracketed) केलं असतं.

### मला निश्चित न पटलेली काही निर्वचनं

महाराष्ट्रीय महिला समाजातील 'अय्या' हा सरळसरळ 'आर्य' याचं रूप आहे. 'आर्यी' पासून 'अज्जी-आजी' व 'आयी-आई' ही दोन्ही रूपे आली आहेत. ज्याप्रमाणे गौतम बुद्धानं 'आर्य' शब्दाचा तिटकारा न करता, 'अरिय चत्तारि सच्चानि, अरियो तुष्हीभावो, अरियो अट्ठंगिको मग्गो, अरियस्स सासने" अशा अनेक ठिकाणी 'आर्य' हा सन्मानदर्शक शब्द वापरला आहे, त्याचप्रमाणं तमिळमध्ये अय्यरु (अय्यर) व अय्यंगारू (अय्यंगार) हे शब्द वापरले आहेत. कन्नडमधील आदरदर्शक-बहुमानाचा वाचक शब्द 'रि' हा 'अरि' यातील 'अ' या आद्यस्वराचा (Aepheresis) लोप होऊनच तयार झाला आहे. 'अर्य' (विदेशी) > 'आर्य' व 'अरि' (रिपू) या दोहोंमध्येही 'ऋ', 'टक्कर देणे', 'सामना करणे' 'to encounter' हाच मूळ धातू आहे. आर्य वाहेरून आले असले पाहिजेत या तर्काला पुष्टी देणाराच हा भाग आहे.

सुरंगा (भुयार) ('सह' यांचे 'परीक्ष्य' पुस्तक, पृ. १०) हा खेरे 'सुर्रि', 'भोक पाडणे' या तमिळी धातूपासुन व्युत्पादितात. आजवर तो syringe या आंग्लशब्दाच्या मूळ रूपाशी जोडला जात असे. कै. प्रा. र.पं. कंगले (कौटिलीयम् अर्थशास्त्रम्, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, १९८२, पृ. पस्तीस) यात Syring या शब्दाचे मूळ असणाऱ्या ग्रीक 'Syrinx' हे रूपही 'सुरंगा' याच्यामागं नसून या शब्दाचा संताळी 'सुरूङ्ग' वा Khmer 'ख्मेररूङ्' याच्याशी संबंध असण्याची संभावना व्यक्त करतात. मला हे अधिक योग्य वाटतं. उदक (पृ. ४०) याचा संबंध तमिळ 'ओऽदम्' शी जोडून त्याचा अर्थ 'ओल, पूर, समुद्र' असा देतात. हे तर मला फारच चुकीचं वाटतं. 'उद' याला स्वार्थे 'क' प्रत्यय लावून हा 'पाणी' असा अर्थ देणारा शब्द आजही गोव्यातल्या पंक्तीत वाढपी लोकांच्या वाणीत आहे." "शितॅं, शितॅं" (भात, शीत-सिक्थ) व "उदा, उदा" (पाणी, पाणी) असे पुकारत हे अन्न-पाण्याचं वितरण करतात. या 'उद'लाच मत्वर्थीय 'र' प्रत्यय लागल्यावर त्याचे 'उद्र' हे रूप Hydro (पाणी असणारं) सिद्ध होतं. 'वातावरण' (atmosphere) याप्रमाणेच 'उदावरण' (hydrosphere) ही असतं, याच 'उदक' म्हणजे 'पाणी' याचं 'हुदक' असं रूप होऊन 'ओदक', 'वोदक' Vodka (drink, liquour) हा शब्द रुसी-हिंदी भाई-भाईंना भुरळ पाडेल असा ठरला आहे. गौर म्हणजे 'गऊ-गाय', गहू, व गव्हाचा दाणा. गऊच्या माय अंगासारखा दिसतो. (पृ. ४१); त्याचप्रमाणे इंग्रजी white हा शब्द wheat (गहू) पासुन आला आहे वगैरे (पृ. ४२) सगळाच प्रकार 'आश्चर्यवत् चैवमेनं शृणोमि" अशीच माझी परिस्थिती करून टाकतो. प्रा. पुरंदरे (रघुवंश काही भागांचे भाषान्तर) म्हणतात त्याप्रमाणे white चा सरळ संबंध संस्कृतातील श्वेत (पांढरा) या शब्दाच्या मूळरूपाशी आहे. कन्या (पृ. ५४) म्हणजे 'मुलगी' हा शब्द 'कनु' – जन्म देणे, 'कन्दु' – लहान मुलगी, व कन्नि या शब्दाशी जोडणे हेही तितकेच गैर वाटते. यास्काचार्य निरुक्तात्, त्याचा कनते; ('कन्') वा 'कमतेः', 'कम्' म्हणजे कन् वा 'कम्' शी जोडतात. 'कम्' चे क.भू.धा.वि. 'न' युक्त 'कान्त' असं होतं. कान्ता म्हणजे 'कमनीय युवती' हा अर्थ जुळतो. पण याहीपेक्षा युरो-भारतीय *Ken, *quen किंवा *qen याशी संबंध जोडणे व कनीज्, Queen, या शब्दांचे दाखले देणे चांगले! नेपाळी काञ्ची (कन्या-कुमारी), काञ्ची, काञ्चीवर, कांजीवर) म्हणजे मुलगी. याचप्रमाणे महाराष्ट्रात senior citizen साठी 'ज्येष्ठ नागरिक' व हिंदीतील 'वरिष्ठ नागरिक' या दोहोत नेमकेपणा नसल्याचं खैरे म्हणतात. (सहं.ची परीक्ष्य पुस्तिका पृ. ५६) संस्कृत 'ज्येष्ठ' व 'वरिष्ठ' ही दोन्ही तमवाचकं आहेत. हे व्याकरणदृष्ट्या अगदी पूर्णपणं खरं आहे. पण मूळ संस्कृतातच तरतमवाचकं फारशी 'तारतम्यानं' वापरली जात नाहीत हे लक्षात घेणं आवश्यक आहे. प्रिय बालिकेस, 'प्रेयसी' म्हटल्यानं ती "मग तुझी 'प्रेष्ठा' कोण?" असा खोचक प्रश्न नायकाला विचारत नाही. मृच्छकटिकातील "हा प्रेयसि, प्रेयसि विद्यमाने" म्हटल्यावर वसन्तसेना देखील 'तरवाचकात' चारूदत्ताला पकडून त्यानं 'माफी मागावी' असा तगादा लावत नाही; कठोपनिषदात यम, नचिकेताला 'प्रेष्ठ' (२.९) म्हणजे 'प्रियतम' म्हणतो. "मी सगळ्यात अधिक लाडका केव्हा व कां झालो?" असा प्रश्न नचिकेतही यमाला विचारीत नाही. 'धाकटी मुलगी' या अर्थानं "सर्वात धाकटी नसलेल्या मुलीसही" मराठीत कनिष्ठ कन्या असंच म्हणतात. 'कमीयसी' नव्हे. 'ज्यायान्', 'वरीयान्', 'कनीयसी' ही तरवाचकं श्रोत्यांना दुर्बोध ठरतील म्हणून






वक्ता समजतील अशी तमवाचक वापरतो येवढंच. 'मुळुकु' म्हणजे 'बुडवणं' या अर्थानं मुळा-मुठा यातील 'मुळा' नदीचं नाव खेरे शोधतात. (पृ. ६७) एकतर अशाप्रकारची रूढ नावं ही त्या नदीचं गुणरूप पाहून अन्वर्थपणानं योजली जातातच असं नाही. pacific (प्रशान्त) हा समुद्र खरंच 'प्रशान्त' नाही. फर्डिनंड मॅगेलनला एका विशिष्ट वेळी या सागराचा फिलिपिन्स बेटांजवळ जो अनुभव आला त्यावरून हे नांव त्यान दिले आणि बुडवणं या अर्थानं सगळ्याच नद्यांना (महाराष्ट्रातील) 'मुळा' म्हटलं गेलं नाही. पालि तिपिटकातील 'सुत्तनिपात' या ग्रंथात दक्षिणापथात बावरि हा (Babylonian) मुनी अश्वक (अश्मकाच्या) प्रशासनाखालील 'मूळक' प्रदेशात (मुळीक हे आडनाव पहा) राहत असल्याचं सांगितलं आहे. ("सो अस्सकस्स विसये 'मूळकस्स' समासने। वसी गोधावरीतीरे उञ्छेन च फलेन च" । पारायणवग्ग, वत्थुगाथा). यामुळं 'मुळा', 'मुळीक' वगैरे विशेषनामं आली आहेत. मुळामुठेत बुडलेला केवळ मुळेतच नाही तर मुठेतही 'बुडलेला' असतो.

**नवी भारतविद्या**

भारतविद्या हे Indology याचं केवळ भाषान्तर आहे. त्यात परस्परविरुद्ध विविधता असू शकेल; जुन्याला बाद करणारी 'नवी' असणार नाही. यात निरनिराळ्या काळात अनेक दृष्टिकोणानं लिहिलं गेलं आहे. थोडक्यात नेहमी प्रमाणंच 'पंथोपपंथ' आहेत. भारतविद्येचा एक फार मोठा भाग 'मिथ्य (कथां)'चाही आहे. अगदी थेट यास्काचार्यांच्या निरुक्ताच्या काळापासून 'नैरुक्त', 'ऐतिहासिक', 'याज्ञिक' अशा प्रकारचे संप्रदाय आढळतात. सूर्यसिद्धान्तपर व सूर्यसिद्धान्त विरोधपर असे दोन मुख्य तट पाश्चात्य पंडितामध्येही पडलेले दिसतात. श्री. खेरे अनेकवार 'ज्योतिःप्रवण' (अंतरिक्षप्रवण') असं भारत-विद्याविषयक मानीव मांडतात. विष्णू म्हणजे धूमकेतू हा त्यांचा विचार ज्यानं-त्यानं आपापल्या पद्धतीनं समजून घेऊन स्वीकारायचा किंवा सोडून द्यायचा आहे. 'सर्वसाधारण आकलन' (common sense) हा निकष सर्वत्रच वापरावा लागतो. 'विष्णू' एवढी महत्त्वाची देवता मूळ धूमकेतुरूप असू शकेल का हे ज्यानं-त्यानं समजून घ्यायचं आहे. राम या चन्द्रराजाची पत्नी झालेली सीता ही जमीन नांगरताना जनकाला सापडली. शेतांमध्ये असे उल्केचे दगड सापडतात. तुटलेली ही 'तारा' राम'चन्द्रा'ची पत्नी झाली. वनवासात हे जोडपं रोहिणीच्या पाच ताऱ्यांनी उभारलेल्या पञ्चवटीत राहिलं. या पाच ताऱ्यांची सुंदर नासिकाकृती होते व म्हणून पंचवटी 'नासिक' क्षेत्री वसलेली होती. हे खेरे यांचं प्रतिपादन उत्प्रेक्षारूप वाटतं. तरीही मी हे कल्पनेचे धागे कसे विणले जातात हे वाचत राहतो. मनात एका वेगळ्याच आनंदाचा अनुभव येतो. 'वनवास हा सुखाचा' हे मराठी भावगीत अधिक पटू लागतं. "सीते दुःखमतो वनम्" ह्या पालुपदाचे वाल्मीकींचेही श्लोक पटेनासे होतात. आजकाल अलिशान बंगल्यांना 'आश्रम', 'कुटीर', 'पर्णशाला' अशी नावं ठेवली जातात. राम-सीता हे 'पंचतारांकित' (Five-star) निवासस्थानी होते असं आधुनिक परिभाषेतून समजून घ्यावं असंही वाटू लागतं. राम म्हणजे चन्द्राचा तेजस्वी भाग, ढगाळ भाग हा लक्ष्मण; सागराला भरतं आणणारा चन्द्र तो भरत आणि लघुचन्द्र म्हणजे शत्रुघ्न ही खेरे यांची समीकरणं पटवून घेण्याची कुवत मेंदीव-मर्यादेमुळं माझ्यात नाही. 'अनेक वर्ष उग्र तपश्चर्या केल्यानं अंगावर वारूळ उगवलं" असा उल्लेख वाल्मीकींच्या रामायणात आढळत नाही व म्हणून "वाळवी लागस्तवर बसला" अशा म्हणीतून हे समजून घेता येईल असं खेऱ्यांना वाटतं. (सहं.ची परीक्ष्य पुस्तिका पृ. १६-१७) मला अजूनही 'वारूळ' व 'कुंभ' ही लोकविद्येतील योनीची प्रतीकं असल्यानं 'योनिज' अशा शास्त्रीय गद्यस्वरूपी शब्दाऐवजी 'कुम्भोद्भव' व 'वाल्मीकी' हे मिथ्यकथेतील शब्द वापरले गेले असले पाहिजेत, असंच वाटतं. 'स्त्री' (पालि 'इत्थी') हा शब्द 'स्त्यै' (फुगणे - हा अर्थ) या धातूपासून तयार झाला आहे. स्त्रीला मातृत्व देणारं गर्भाशय इंग्रजीत 'युटेरस्' या शब्दानं ओळखलं जातं. 'युटेरस' व 'स्त्री' यात एकच युरो-भारतीय धातू आढळतो. याचमुळं महिला वारूळाला 'पुंजायाला' जातात. महाराष्ट्रात 'घटपूजा' होते. गुजराथमध्ये आत दिवा ठेवलेल्या घटाभोवती फेर धरून 'गर्भ' (दीपगर्भ) नृत्य (गरबा-गरबो) केलं जातं. नारळानं 'ओटी' भरणं हे, गर्भिणीच्या 'जरायू' मध्ये असलेल्या गर्भाचं टाळू (डोकं) स्थिर व्हावं (Head-fixing) म्हणून, शिरःफलानं ओटी भरली जाते. ('श्रीफळ' नव्हे; श्रीफल म्हणजे संस्कृतात 'बेलफळ') (कन्नड - टेंगेन-काई, मस्तकासारखं दिसणारं फळ). डोक्याला मार लागला की टेंगूळ येतं. "चांगला नारळ फुटला असता" हा वाक्प्रयोग कन्नडमध्ये 'टेंगेनकाई छलो वडितित्तु', 'तुटणं', 'कापलं जाणं' या अर्थाचा संस्कृत 'वृध्' धातू असल्यानंच बांगडी 'फुटली-तुटली' तर 'वाढली' हे अभिधार्थातच म्हणतात.






'अन्न वाढणं' यात 'बटवारा'च अभिप्रेत आहे. 'लाकूड कापणारा' म्हणूनच 'वर्धकी' आहे आणि या 'वृध्'चा युरोभारतीय मूळ धातू 'स्वृध्' पासून आंग्ल (s)word तयार झाली. सलिल (पृ. ४०) 'वाहते पाणी', 'झरा' या अर्थीचा संस्कृत शब्द तमिळ 'सेल्' म्हणजे वाहणे' या क्रियापदापासून आला असल्याचा दावा खेरे करतात. मला खरं तर अजूनही 'सल्' म्हणजे इंग्लिश - 'salt, saline, salary' या मधील 'सल्' ('मिठाचा', खारट) हाच अंश या शब्दामागे दिसतो. यांचा मूळ अर्थ 'सागरजल' त्यानंतर हा विशेष लुप्त होऊन 'सर्वसाधारण जल' असा अर्थ झाला. पूर्वी पगार हा चलना ऐवजी 'मीठ' (म्हणजे मीठ-भाकरी) असा वस्तुरूपात दिला जाई. यातूनच स्वामिनिष्ठा (loyality) दाखवणारा 'मिठाला जागणं' हा शब्दप्रयोग साधला गेला. हातावर पोट असणाऱ्या मजुरांना दररोज दिवस-अखेर मजुरी मिळते. ते कामगार व त्यांच्या स्त्रिया वाण्याच्या दुकानात जाऊन (छोट्या बाटलीत) तेल, थोडं मीठ, पीठ आणून तीन दगडांवरच्या चुलीवर खापरं ठेवून बडवलेल्या भाकऱ्या भाजतात, हे आपल्याला माहीत आहे. ही झाली मिठाची कमाई म्हणजे Salary.

### मुख्य आक्षेप

भारतविद्येत ज्यानं त्यानं आपापल्या दृष्टिकोणातून मतं मांडावीत असंच मी म्हणेन. मात्र आपली मतं प्रस्थापितांना पटावी लागतात, असं असल्यानं प्रश्न निर्माण होतात. मंडन करता येत नसेल तर खंडन तरी टाळावं या सद्हेतुनंही प्रस्थापित मुग्धता बाळगत असावेत. त्यांचे बाबत केलेलं विधान 'कटू' म्हणून 'सार्थ' ठरणार नाही. तमिळमधून संस्कृतनं अनेक शब्द स्वीकारल्याच प्रस्थापित नाकारत तर नाहीच पण हे सत्य प्रस्थापितांनी लेखन करून पटवूनही दिलं आहे व मान्यवर भाषाविशारदांनी ते समजूनही घेतलं आहे. याचसाठी अधिक मोठ्या प्रमाणात मराठीतील शब्दांमागचे तमिळ शब्द श्री. खेरे यांनी उत्साहानं सादर करावेत. त्या लेखनाची पूर्ण दखल घेतली जाईल, चर्चा होईल आणि ऐतिहासिक भाषाविज्ञानाच्या चाळणीतून ते चाळलंही जाईल. पण यामुळं 'सिद्ध' युरो-भारतीयाचा 'अन्त' होणार नाही; तो 'सिद्धान्त'च राहील. खेऱ्यांशी फार मोठा मतभेद म्हणजे युरो-भारतीय भाषा ही संकल्पना न स्वीकारण्याबाबतचा आहे. याच्या मागे त्यांची नेमकी कोणती मनोभूमिका आहे हे मला कळत नाही. यावर खेरे म्हणू शकतील की, " 'मनोभूमिका' अशी शून्य; 'वस्तुस्थिती' आहे". ठीक आहे. खेरे यांच्यावर दोषारोप नकोत. इतर काहींच्या बाबतीत मात्र मला अनेकदा एक विचित्र देशाभिमान जाणवतो. आर्य भारतात कुठूनही बाहेरून आले नाहीत; ते इथलेच होते. ते बाहेरून आल्याच्या काही वाङ्मयीन खुणा दिसत नाहीत असंही म्हटलं जातं. याचा प्रतिवाद या उलट पाऊलखुणा (म्हणजे भारतातून मध्य-आशिया, इराण व रशियाच्या गवताळ प्रदेशांकडे ते गेले) असल्याचाही पुरावा आढळत नाही, हेही तितकंच खरं आहे. पण त्याचबरोबर समग्र वैदिक व संस्कृत साहित्य उपलब्ध नाही हेही तितकेचं खरं आहे. ऋग्वेदाची आज केवळ 'शाकल' शाखा उपलब्ध आहे. 'बाष्कल' शाखेचे केवळ निर्देशच मिळतात (अलिकडेच 'बाष्कल' उपनिषद् उपलब्ध आले आहे) मला पुरेसा पुरावा मिळाला तर (व तरच) शाकल म्हणजे मिलिन्दपञ्ह या पालि-ग्रंथांत वर्णिलेलं 'शाकल' नगर किंवा सियालकोट येथे संहितीकरण झालेली शाखा व बाष्कल म्हणजे बाल्ख (Bactria) येथे संपादित केलेली संहिता असं एक मानीव मी पंडितांच्या परीक्षणासाठी ठेवीन म्हणतो. बलुचिस्थानातील (व अफगाणीस्थानातीलही) पठाणांचा उल्लेख 'भलानासः (भलुचो, पालीतील 'बालाकिनिया परिसा') व 'पक्थिनः' (पठाण) या टोळ्यांच्या नावात सापडतो. एलामचे (Elam) उल्लेख 'अहिंसा' या कै. धर्मानंद कोसंबी यांच्या महत्त्वपूर्ण ग्रंथाच्या प्रस्तावनेतून काळजीपूर्वक टिपावेत. अथर्ववेदातील 'मूजवान्' पर्वताचा उल्लेख, 'ताबुव' अशा प्रकारचे शब्द, ऋग्वेदातील 'रसा', अवेस्तातील 'रंहा' व युक्रेनमधील छोट्या 'रश्शा' तील Russa या नद्यांच्या नावांचा toponymic shift म्हणजे पूर्वीचे नाव नंतरच्या बाबीला दिले जाणे या दृष्टीतून समजून घेणं आवश्यक आहे. हओम व सोम यांचा भाषिक संबंध समजून घ्यावा. 'ऐर्यन् वइजो' ('आर्यबीज' किंवा 'आर्यव्रज' म्हणजे मूलस्थान) आज अझरबेआनच्या रूपात दिसतं कां हे पहावं. 'भगदत्त वा भगदात्' हे 'बगदाद' चे मूळ रूप आहे कां हे तपासावे. ग्रीक Kel वा 'Quel' (calesthenics caleography) पालीतील 'कल्लो'सि; संस्कृत 'कल्याण' (शुभ) व तरुणीसाठी 'कल्याणी' (शुभा) यांचं असलेलं नातं समजून घ्यावं. वॅकरनॅगेल, सुनीतिकुमार चटुर्ज्या, डॉ. मेहेंदळे, डॉ. कत्रे, डॉ. घाटगे, बाबुराम सक्सेना, इल्या गेर्शिव्हिस, पॉल थिम, टर्नर, जॉर्ज कार्दोना असे सहस्रावधी भाषापंडित






ज्या विषयी लिहितात आणि युरोभारतीय उत्प्रेक्षित धातूंची बृहत्सूची सादर करतात, त्याचं काय? त्याचं रीतसर खंडन शक्य आहे का? भारताविषयी भक्ती असणारे सावरकरपूजक डॉ. ग.बा. पळसुले (नुकतेच दिवंगत झाले.) यांसारखे विद्वान् 'युभातः संस्कृतं प्रति' (Evolution of Sanskrit from Proto Indo-European राष्ट्रीय संस्कृत संस्थान प्रकाशन, नवी दिल्ली), सारखा ग्रंथ लिहितात. यास काही अर्थ नाही का? हे सर्वही चुकू शकतात व खैरे अचूक असू शकतात, हे तर्कतः मला मान्य आहे. पण संभाव्य किती प्रमाणात असू शकेल? या अभ्यासकांवरही अन्याय होऊ नये, असं मला वाटतं.

खैरे यांनी ऋग्वेदातील व अवेस्तातील शब्दसाम्याचा विचारही कोठे मांडला नाही. ती साम्यस्थळेही संभ्रम-निर्मित आहेत हे तरी त्यांनी दाखवून द्यावं अशी मैत्रीपूर्ण विनंती 'सहं'नी त्यांना करावी. 'गोः' हा शब्द (cow) मूळ सुमेरी आहे. 'असूर्या लोकाः' ही काल्पनिक देशसंज्ञा नाही ती Assyria साठी वापरली गेली असण्याचीच शक्यता अधिक आहे. दुबई (दुपई) हे 'द्वीप' आहे, आणि असं बरंच काही सांगता येईल.

रामायणातील 'भरत' म्हणजे सागराला भरती आणणारा चन्द्र असेल तर ऋग्वेदातील भरतांची टोळी म्हणजे काय? 'भरति' याचं अवेस्तात 'बरइति' असं रूप होतं.

पुढील केवळ नमुन्यासाठी दाखवलेला तक्ता काय दर्शवितो?

| ग्रीक | लॅटिन | जर्मन(गोथिक) | आंग्ल | संस्कृत |
|---|---|---|---|---|
| पातेर | पातेर | फाटर | फादर | पितृ-पितर |
| फेरोमि | फेरो | बेर | बेअर | भरामि |
| क्युऑन | कनिस् | हुंड | हाउंड | श्वन् |
| बौस | बोस | खु | खाउ (Cow) | गो |

यासाठीच रॉयल एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगॉल येथे व्याख्यान देताना (फेब्रुआरी २, १७८६), सर विल्यम जोन्स यांनी जे उद्गार काढले की, "संस्कृत भाषेची प्राचीनता जी काही असेल ती असो – तिची घटना आश्चर्यकारक आहे. ग्रीक भाषेहून अधिक बांधेसूद, लॅटिनहून अधिक समृद्ध आणि या दोहोंपेक्षाही अधिक प्रौढ व परिष्कृत असं तिचं स्वरूप आहे. आणि तरीही क्रियापदांचे धातू आणि व्याकरणाची रूपं यांच्या दृष्टीनं पाहता हे केवळ योगायोगानं संभवणार नाही इतकी या दोन्ही पाश्चात्य भाषा व संस्कृत ही पौर्वात्य भाषा दृढ संबंध व जवळीक सूचित करणारी रचना प्रकट करतात. यामुळंच या भाषा कोणत्या तरी एकाच उद्गमातून अवतरल्या आहेत असं मानण्याखेरीज गत्यंतर नाही."

जोन्स यांचा हा तर्क सुप्रतिष्ठित ठरला म्हणून तर फ्रान्झ बॉप यांनी अशी "मूळ युरोभारतीय भाषा" बोलणारे 'वीरासः' (ऋग्वेदातील) हे वीर जन एका काळी कोठेतरी एकत्र राहत असावेत असं म्हटल्यानं आर्यांच्या मूळ वसतीस्थानाचा शोध सुरू झाला.

प्रा. माडुलकर (वृद्धिः मराठी भाषा विकास संस्था) यांनी आपल्या २००० सालच्या पुस्तकात याच सिद्धान्ताचा उल्लेख केला आहे. "खैऱ्यांच्या प्रतिसिद्धान्ताचा आरंभ १९७७ च्या स्वातंत्र्यदिनी 'अडगुलं मडगुलं' या लेखनात झाला!" असं प्रतिपादन फार मोठ्या झोकदार शैलीत 'सह' करतात हे खरं (पृ. २). पण तमिळभाषा मराठीतील काही शब्द उमगण्यासाठी उपयोगी पडते, या पलिकडं जाऊन आजवरच्या जोन्स-बॉप परंपरेतील लेखनाचं खण्डन खैरे यांनी केलं असं त्यामुळं मानता येणार नाही.

William Jones and Indian Linguistics या एका १९९६ सालच्या लेखाव्यतिरिक्त श्री. खैरे साकल्यानं युरो-भारतीय सिद्धान्त खोडून काढतात का? त्यांना कै. पळसुळे यांच्या याविषयीच्या ग्रंथाचा Destructive Survey घ्यावा लागेल.

तमिळ मधून मराठी व मराठीतून उद्भ्रंशानं संस्कृत हे मानीवच अप्रत्यक्षपणे हा विद्वन्मान्य व भक्कम पुराव्यांवर प्रभूत लेखन (अनेक थोर भाषावैज्ञानिकांनी) करून मांडलेला युरोभारतीय सिद्धान्त बाधित करतं असं आणखी एक 'मानीव' स्वीकारायचं का? आणि येवढी मंदीव उंच-उडी (high-jump) समजा कोणी मारलीही आणि ती प्रज्ञातेजस्विनी व्यक्ती अन्तरिक्षात ताऱ्यासारखा स्थिर झाली तर तिचे पाय पुन्हा पृथ्वीतलावर टेकतील असं कोण करू शकेल? ही प्रज्ञा-तारा तुटून धाडकन उल्कारूपानं दरभंग्यात जनकक्षेत्री पडेल (पृ. १५) तेव्हा कोठे हे वैचारिक विमान सुरक्षितपणानं अवतरलं (land झालं) म्हणायचं!

अनुक्रमणिका





**खैऱ्यांच्याही पलिकडले**

परिच्छेदाचं शीर्षक हे 'शब्दांच्या पलिकडले' याची एक भ्रष्ट ('उद्-भ्रष्ट' नव्हे) नक्कल आहे. लेखनाच्या भरात मी थोडं अधिक-उणं लिहिलं असल्यास मनापासून क्षमा मागतो. मी खरं तर त्रिवार विचार केला. काही वाक्यं खोडूनही टाकली पण, याविषयीची माझी भावना (केवळ 'बौद्धिक धारणा' नव्हे) मी वापरलेल्या पद्धतीखेरीज व्यक्त होत नाही हे जाणवल्यावर केवळ अगतिक म्हणूनच मी ती वाक्यं पुन्हा समाविष्ट केली. विचार-स्वातंत्र्य, वाक्-स्वातंत्र्य व लेखन-स्वातंत्र्य हे सर्व मी मान्य करणं अशी बाब नाही. ती निसर्गसिद्ध आहे. मी अजून सांगतो की, श्री. खैरे यांचं सौजन्य, त्यांचा व्यासंग, संस्कृतवरील प्रभुत्व, लोकविद्येकडं असलेला ओढा, प्रकाशनात पैसे ओतून इतरांना त्याचं वाटप करण्याची उदारता व याहूनही कितीतर अधिक गुणसंपदा मी मान्य करीन, कारण ती सत्य आहे. द्राविडी भाषांचा आर्यभाषांवरील प्रभाव सांगतांना ते अभेद सांगू लागले. यामुळे कदाचित डॉ. अशोक केळकर, डॉ. द.ता. भोसले, डॉ. गो.मा. पवार यांना या प्रतिपादनाची तळी उचलून धरणं अवघड वाटलं असेल. पण त्यांनीही 'मंडन' केलं नसलं, तरी 'खंडन' ही करायला लेखणी उचलली नाही, हे त्यांना न्याय देताना म्हणायलाच हवं. डॉ. स.ह. देशपांडे यांनी तर त्यांचा अनाग्रही, निष्पक्ष-पातीपणा एका बाजूनं खेरे यांच्या लेखनाची दखल घेतली जावी यासाठी भाषाशास्त्रात अवगाहन करून व पुस्तक लिहून दाखवली आणि त्याचवेळी तेच पुस्तक श्री. व सौ. गो.मा. पवार यांनाच स्नेहानं समर्पित करूनही दाखवली. तमिळ आणि मराठी या भाषा भौगोलिक दृष्ट्या दूरच्या नाहीत. बलुचिस्थानात असलेली द्राविड-कुळातली ब्राहुई ही त्याहून बऱ्याच दूर अंतरावरची आहे. पण इटलीच्याही पलिकडे असणाऱ्या 'एत्रुरिआ' या भागातली 'एत्रुरिअन', 'एत्रुस्कन' किंवा 'टस्कन' भाषा ही देखील द्राविड पृष्ठभूमी दाखवते असा दावा एका विस्तृत प्रबंधात मांडला गेला आहे (Prof. Torp: "Etruskische Beiträgue" Bant I und II. Leipzig. 1902-1903) हा प्रबंध मी अमेरिकेत असतांना वाचू शकलो ते केवळ एका उत्कृष्ट जर्मन जाणकाराच्या सदय साह्यामुळंच.

पण त्यानंतर द्राविडी व अल्टाइक भाषांमधील वेधक साम्यांविषयीचा एक मोठा लेखही वाचनात आला. हा थोड्या प्रयत्नानं पुण्यातही वाचायला मिळेल. त्याचा पूर्ण पत्ता देतो. Similarities between Dravidic and Altaic Languages. (Proceeding of the Oriental Congress XX<sup>th</sup> Session held at Paris). तमिळ 'प'चा उच्चार कन्नडमध्ये 'ह' होतो. 'पळ्ळि=हळ्ळि', 'पू=हू' (पुरण-पोळिगे = हुरणहोळिगे). संस्कृतात 'प'चा 'व' व पुढं 'व'चा 'ब' होणं येवढंच संभवतं. (कवि = कपि). पण फार दूरवर असलेल्या जपानी भाषेतही 'हा' व 'असेच' बरेच काही 'प्रकार' होतात हे लक्षात आल्यावर आता अंताराष्ट्रीय भाषाभिज्ञ या दोन भाषांच्या पारस्परिक संबंधांबाबत विलक्षण 'सतर्क' झाले आहेत.

खैरे यांचं मत मला पूर्णपणानं पटत नाही हे खरं असलं तरी त्यांनी मारलेली उडी अल्टाइक, एत्रुस्कन व जपानी या उड्यांच्या मानानं बरीच आटोपशीर व बेताची आहे, हे मात्र मी पूर्णपणं मान्य करतो. कोणत्याही भाषेवर थोडे-बहुत संस्कार होतात हे कोणीही मान्य करेल पण पूर्णपणे कृत्रिम भाषा रचून त्यात (संस्कृतमध्ये) येवढं साहित्य निर्माण करायचं असा प्रकार का व कशासाठी होईल? झाल्यास येवढा यशस्वी होईल का? याचा श्री. खैरे यांनी मनापासून विचार करावा. त्यांनी इतर काही, त्यांना अधिक जवळचे, अधिक स्नेहल असे वाटणारे समानधर्मी उदा. अर्जुनवाडकर दांपत्य, गो.मा. पवार, स.ह. देशपांडे, सौ. हेमा क्षीरसागर यांच्या सारख्यांशी थोडी अधिक सविस्तर चर्चा करून स्वतःच्या लेखनाची नव्यानं, काहीशी बदलून मांडणी करावी असं मला वाटतं.

**लोक-'विद्या' व 'अ'-विद्या**

लोकविद्येचा विचार ही या काळची फार मोठी अशी पुस्ती आहे. पण त्यातही 'असली-नकली' हा प्रकार आहेच. असली लोकविद्या (Folk-lore) आहे. नकली 'अविद्या' (Fake-Lore) आहे. दळताना, कांडताना, कामं करताना, होडी चालवताना म्हटलेली गाणी 'असली' आहेत. पण तुकाराम महाराजांचाच आहे की काय असा वाटणारा 'आधी बीज एकले' हा अभंग, 'रातभर न्हावा, झुंजुरका तुम्मी जावा जी' असा गदिमांचा अनुवाद-आविष्कार, "डौल मोराच्या मानाचा – ये (वे) ग रामाच्या बानाचा" हे सर्व काव्य बहारदार आहे. ही खरीखुरी लोकगीतं वाटतात, पण प्रत्यक्षात ती तशी नाहीत. पण पु.ल. ज्याप्रमाणे 'शतकु बिसु नाही चांगु' हे लिहू शकतात, 'तुका म्हणे विल्या' असं विं.दा. लिहू शकतात, 'चौर्यकर्म







विशारदा – तूं ते प्रसन्न होवो शारदा' असं 'झेंडुचं फूल' बाबुराव अत्रे आपल्या हातावर ठेवू शकतात. अशा प्रकारचे लोकसाहित्यानुकृतिपर भागही ध्यानात घ्यायला हवेत. अधिक सावध-समजंस लोकविद्येचा 'आधारू' व 'तमिळेन विज्ञातेन सर्वं विज्ञातं भवति' ही अपश्रद्धा टाळून सम्यक्-श्रद्धेनं सादर केलेलं "तमिळ भाषा व संस्कृतीचं योगदान" हे लेखन या काळात विश्वनाथांनी नाही तर कोणी करायचं? दृढ-धारणा (conviction) असेल तर तमिळ-महाराष्ट्र या दोहोंमधील अनेकविध (भाषा, साहित्य, संस्कृती, रीतिरिवाज) यांच्यातील (आदान-प्रदानपर) संबंधांवर श्री. विश्वनाथजी खेरे यांनी लिहित राहावं. सहं इतकेच आम्हीही त्यांचे चहाते आहोत. पण खेऱ्यांनी असं लेखन केलं नाही तर मग मात्र माझ्या सारख्या जिज्ञासूंची काही 'खेर' नाही!

### लेखनसूची व लेखातील चर्चेबाबतच्या काही अधिक टीपा

१) नवभारत, वर्ष ५५, अंक १०, १९९१, पृ. ३४-३७.

२) नाटकातील प्राकृत हे ही बोलीभाषेचं रूप नसून तीही एक कृत्रिम भाषाच असल्याबद्दल कीथ यांचं मत "the dialects used for instance even in the Mṛcchakaṭika are clearly literary and not attempts to reproduce true vernaculars"

Keith A.B., Sanskrit Drama, Oxford Uni. Press, 1964, p. 74.

"The ground for the more extended use of dialects when found may be attributed to literary purposses rather than to any attempt to imitate the speech of the day".

Geoge Grierson. (Journale, Asiatiaqe, xxx. 556)

३) ओल्डेनबर्ग यांचे ऋग्वेदीय साहित्य हे लोकसाहित्य नसुनं याज्ञिकांचं असल्याचं मत मॉरिझ विन्टरनिट्झ (द हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर, खंड १, मोतिलाल बनारसीदास दिल्ली, १९८१, पृ. ६६)

"Such (i.e. Ṛgvedic) poetry could have been born only in the closed circles of priestly sacrificial technicians".

डॉ. मो.गो. धडफळे

**

---

## लेखक परिचय

- **द.तु. पाटील** : अस्पृश्यता निर्मूलन – 'घराण्यांची कार्यपद्धती' या लेखाचे लेखक. **पत्ता** : भाऊराव काकतकर कॉलेज, क्लब रोड, बेळगाव.
- **गं.रा. पटवर्धन** : एम.ए. (अर्थशास्त्र), आयकर आयुक्त (निवृत्त), गोखले अर्थशास्त्र संस्थेचे विद्यार्थी, जेष्ठ विचारवंत **पत्ता** : ८०० भांडारकर रोड, पुणे ४११ ००४.
- **डॉ. मो.गो. धडफळे** : मानद सचिव भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंडळ. **पत्ता** : 'सदनिका क्रं. २' 'यशोदिप-ब' रामबाग वसाहत, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.
- **अशोक पांडुरंग दाणी** : एम्.ए., पी.एच्.डी. फर्गसन महाविद्यालयामध्ये २० वर्षे इंग्लिश विभाग प्रमुख, पदव्युत्तर अध्यापन व संशोधन मार्गदर्शन. प्रभारी प्राचार्य, फर्गसन महाविद्यालय सेवानिवृत्त (२००० इ.स.) बरेच संशोधन निबंध Critical Anthologies मध्ये प्रसिद्ध झालेले आहेत. **पत्ता** : प्रा. डॉ. अ.पां. दाणी, पुणे, प्लॉट क्र. १४, आरती अपार्टमेंट, कर्वे नगर, पुणे ४११ ०५२.

अनुक्रमणिका








# पुस्तक परीक्षण

## शेक्सपीअरची शोकनाट्ये

शेक्सपिअरच्या 'सॉनेटस्" आणि "हॅम्लेट"चा मराठी अनुवाद प्रसिद्ध करणारे श्री. परशुराम देशपांडे यांनी "शेक्सपिअरची शोकनाट्ये (द ट्रॅजिडीज् ऑफ् शेक्सपिअर) हा सर्मीक्षा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे, त्याला "अभ्यास ग्रंथ" असेही म्हटले आहे. जगविख्यात आंग्ल कवी आणि नाटककार शेक्सपीअर स्वातंत्र्यपूर्वकाळापासून आतापर्यन्त मराठी वाचकांना अनुवादाच्या आणि रूपांतराच्या रूपाने आकर्षित करीत आहे. अभ्यासक आणि समीक्षकांनीही मराठी वाङ्मयाला शेक्सपीअरचे योगदान कसे आहे त्याची अविरत चर्चा केली आहे व त्याच्या काव्याची व नाट्यकृतींची मराठीतून समीक्षा प्रसिद्ध केलेली आहे. साहित्य संस्कृती मंडळाने प्रसिद्ध केलेल्या 'शेक्सपीअर परिचय ग्रंथा'च्या संपादनात कै. डॉ. वि.ना. ढवळे ह्या आंग्लवाङ्मय विद्वद्वर्यांचा समावेश होता ह्याचा आवर्जून उल्लेख करावयास हवा. प्रस्तुत ग्रंथ हा 'परिचय ग्रंथ' नसून 'अभ्यास (समीक्षा) ग्रंथ' आहे असे म्हटल्यावर शेक्सपीअर समीक्षेच्या व्याप्तीचा आणि व्यामिश्रतेचा संदर्भ येणे अपरिहार्य आहे. शेक्सपीअर सारखे उत्तुंग परंतु बहुचर्चित व्यक्तिमत्त्व आंग्लवाङ्मयात दुसरे नाही. शेक्सपीअरच्या समकालिकांपासून प्रस्तुत कालापर्यंत शेक्सपीअर ह्या व्यक्तीविषयी आणि वाङ्मयाविषयी परस्पर विरोधी मतान्तरे, समीक्षा आणि संशोधन ह्यांची प्रक्रिया अव्याहत चालू आहे. त्याच्या अज्ञानापासून अगाध ज्ञानापर्यंत, तोकड्या शिक्षणापासून प्रकांड विद्वत्तेपर्यंत एवढेच नव्हे तर शेक्सपीअर नावाच्या व्यक्तीने तथाकथित शेक्सपीअर वाङ्मय लिहिलेले नसावे की असावे ह्याविषयी अभ्यासकांची आणि तज्ज्ञांची चर्चा कायम चालू आहे. शेक्सपीअरचे चरित्र आणि त्याचे वाङ्मय - विशेषत: सॉनेटस् (सुनीते) - ह्यांचा आत्मचरित्रात्मक संबंध असत्य वादग्रस्त विधानांनी व्यापलेला आहे. मात्र ह्यांची दखल घेणारी विवेचनात्मक सावधानपूर्वक केलेली विधाने श्री. देशपांड्यांच्या ग्रंथात आढळत नाहीत. शेक्सपीअरची शोकनाट्ये (ट्रॅजिडीज्) अंभ्यासताना ग्रीक शोकनाट्ये आणि ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र (पोएटिक्स) व त्याची शोकनाट्यमीमांसा तसेच सेनेका ह्या रोमन नाटककाराची शोकनाट्ये व प्रबोधनकाळातील (रेनेसन्स) युरोपियन नाट्यकृतींवरील त्यांचा प्रभाव, शेक्सपीअरच्या (एलिझाबेथ राणीच्या) काळातील इंग्लिश शोकनाट्ये व त्यांचे आकृतिबंध, शेक्सपीअरच्या समकालीन नाटककारांची (मार्लो, वेबस्टर इ.) शोकनाट्ये, शेक्सपीअरच्या शोकनाट्यांचा आणि तत्कालीन सामाजिक, राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक, धार्मिक, वर्गकलह यांचा संबंध आणि शेक्सपीअरची नाट्यकृती ही कलाकृती म्हणून तिची केलेली समीक्षा यांचा सर्वांगीण विचार करावा लागतो. याशिवाय शेक्सपीअरने नाट्यकृतींमध्ये केलेला काव्यमय भाषेचा तसेच गद्यमय भाषेचा वापर, तसेच प्रतिमा, प्रतिके ह्यांचा कौशल्यपूर्ण केलेल्या उपयोजनेमुळे एकसंधता व परिणामकारकता दृढ होण्याची प्रक्रिया यांचा हृद्य अभ्यास रसिकाला व अभ्यासकाला मोहून टाकतो. शेक्सपीअरच्या शोकनाट्यांचा अभ्यास ॲरिस्टॉटलने सुचविल्याप्रमाणे संविधानक (प्लॉट) व्यक्तिरेखा किंवा पात्र (कॅरेक्टर), भाषा (डिक्शन), आशयसूत्र (थीम) आणि रंगमंचीय आविष्कार (स्पेक्टकल) ह्यांच्या अंगांनी करता येतो. शेक्सपीअरच्या मराठी समीक्षेत ह्यातील केवळ संविधानक व्यक्तिचित्रण आणि आशयसूत्र ह्या अंगानीच विचार करता येतो. रंगमंचीय आविष्काराच्या दृष्टीने समीक्षा करताना शेक्सपीअरकालीन रंगमंच, नाट्याविष्कार परंपरा व नाट्यसंकेत (ड्रॅमॅटिक कन्व्हेन्शनस्) ह्यांचा सूक्ष्म अभ्यास असणे आवश्यक आहे. श्री. देशपांडे ह्यांनी साहजिकच संविधानक व्यक्तिचित्रण आणि आशयसूत्र ह्यांच्या दृष्टीने शोकनाट्यांचा विचार केला आहे. काही ठिकाणी रंगमंचीय आविष्काराच्या दृष्टीने विचार केला आहे. परंतु तो अपूर्ण वाटतो. ("कोरिओलोनस" नाटकाची समीक्षा करताना नाटककाराच्या सामाजिक, राजकीय व आर्थिक परिस्थितीचेच प्रतिबिंब नाटकात पडले आहे असे निश्चित विधान आहे.) नाटककाराच्या चरित्राचा आधार घेऊन तो 'ज्युलिअस सीझर' नंतर 'हॅम्लेट'कडे कसा व का वळला किंवा "ॲण्टनी ॲण्ड क्लिओपॅट्रा"कडे का आला यासंबंधी केलेली विधान प्रयोजननिष्ठ हेत्वाभास (इण्टेन्शनल फॅलसी) ह्या दोषास पात्र होतात. चरित्रात्मक समीक्षेच्या (बॉयग्रॅफीकल् क्रिटीसिझम) मर्यादा लेखकाने लक्षात घेतलेल्या दिसत नाहीत. सॉनेटस् मध्ये व्यक्त झालेल्या प्रेम ह्या कल्पनेचा आविष्कार आणि 'रोमिओ ॲण्ड ज्युलिएट'

तसेच 'ॲण्टनी ॲण्ड क्लिओपॅट्रा' ह्यातील आशयसूत्रांवर त्याचा झालेला परिणाम ह्यासंबंधी त्यांची विधाने या दृष्टीने संशयास्पद वाटतात.

श्री. देशपांडे यांनी प्रस्तावनेत शेक्सपीअरच्या शोकनाट्यांच्या वैशिष्ट्यांचा विस्तृत ऊहापोह केला असून त्यांच्यातील साम्यभेदांची चर्चा केली आहे व नंतर 'रोमिओ ॲण्ड ज्युलिएट' पासून 'कोरिओलेनस' पर्यन्त आठ शोकनाट्यांचा स्वतंत्र परामर्श घेतला आहे. परंतु दोन इतिहास शोकनाट्यांचा (हिस्टरीज) त्यात समावेश नाही. ब्रॅडलेने प्रयत्न केलेला असला तरी शेक्सपीअरच्या शोकनाट्याचा स्वतंत्र सिद्धान्त सांगता येत नाही. किंवा शोकनाट्याच्या ठरीव आकृतिबंधाचे वर्णन करता येत नाही. तथापि असे दिसते की प्रत्येक शोकनाट्याचा नायक – मग तो तिसऱ्या रिचर्ड सारखा क्रूर किंवा रोमिओ सारखा निष्पाप असो – दैवगतीमुळे आणि स्वतःतील दोषांमुळे तसेच इतर पात्रातील अशिव (इव्हिल) प्रवृत्तीमुळे (उदा. इयागो किंवा गोनेरिल) नाश पावतो. प्रत्येक शोकनाट्यात नायकाबरोबरच निष्पाप व्यक्तीचाही नाश होतो (उदा. ऑफेलिया, डेस्डिमोना) शेक्सपीअरची शोकनाट्ये निसर्ग व मानवी जीवनाचा केवळ गहन अर्थ सांगत नाहीत तर त्यांची अतर्क्य, अनाकलनीय अव्यक्त रूपे उलगडण्याचा प्रयत्न करतात. सत्य (रिॲलिटी) आणि भासरूप (ॲपिअरन्स) यातील संघर्ष व्यक्त करतात. 'हॅम्लेट' मध्ये डेन्मार्क राज्याच्या अधःपाताने प्रदूषित झालेल्या वातावरणाने भारलेल्या व्यक्ती व घटना विचारी राजपुत्र हॅम्लेटला सूडकृतीसाठी योग्य विलंब (डिले) मिळू देत नाहीत. 'ऑथेल्लो' मध्ये व्यक्तीच्या भयग्रस्त एकलेपणामुळे घटनांची तीव्र गती असूया ह्या आशयसूत्राचे अनेक आयाम दर्शविते. 'किंग लियर' मधील वादळदृश्ये नायकाच्या मूढतेची आणि नैतिक अधःपतनाची तीव्रता वाढवितात. तरी श्री. देशपांडे म्हणतात त्याप्रमाणे राजा लियरला दोषमुक्ती (रिडेम्प्शन) मिळते. हे तितकेसे सत्य नाही कारण हे नाटक ख्रिस्तपूर्व (पेगन) काळातील कथेचे नाट्यीकरण आहे. त्याचप्रमाणे देशपांडे म्हणतात तसे इयागोला ऑथेल्लोवर जीवघेणा सूड घेण्याचे सयुक्त कारण आहे हे योग्य नाही. 'कॉलरिज़ची मोटिव्हलेस् मॅलिग्नन्सी' ही मीमांसाच योग्य आहे. 'मॅकबेथ' मधील रक्त (ब्लड) आणि घनतिमिर (डार्कनेस) यांचे अधिराज्य नाटकाला अपूर्व सेन्द्रिय एकता देते. प्रत्येक शोकनाट्यातील आशयसूत्राची अभिव्यक्ती करताना शेक्सपीअर भिन्न साधनांचा वापर करतो. 'ऑथेल्लो' मध्ये नाट्यछद्म (आयरनी) तर 'मॅकबेथ'मध्ये प्रतिपक्षात्मक विरोधाभास (अण्टि थिसिस) आणि "हॅम्लेट" मध्ये प्रश्नालंकाराचा (ऱ्हेटॉरिकल क्वेश्चन) अत्यंत परिणामकारक उपयोग झालेला आहे. अर्थात ही नाट्यभाषा समीक्षा मराठी समीक्षेत अपेक्षित नाही तरी शेक्सपीअरच्या ह्या भाषाप्रभुत्वाचा स्पष्ट उल्लेख असणे आवश्यक आहे. 'रोमिओ ॲण्ड ज्युलिएट' आणि 'ॲण्टनी ॲण्ड क्लिओपॅट्रा' ह्या नाटकांच्या प्रेम ह्या आशयसूत्राचे वैविध्यपूर्ण आयाम श्री. देशपांडे यांनी परिणामकारकरीत्या चर्चिले आहेत. परंतु येथेही विशेषतः 'ॲण्टनी ॲण्ड क्लिओपॅट्रा' मध्ये संपत्ती, ऐहिक ऐश्वर्य, शस्त्रसामर्थ्य, वैश्विक प्रतिमा विश्व ह्यांचे दर्शन शेक्सपीअरच्या अपरिमेय काव्याच्या समृद्धीत व चैतन्यशक्तीत होते. ह्याचा उल्लेख आवश्यक आहे.

श्री. देशपांडे ह्यांनी दिलेल्या काही अनावश्यक परिशिष्टांमध्ये नाट्यकृतींचा संक्षिप्त परिचय हे परिशिष्ट उपयुक्त असले तरी त्यात त्रुटी आढळतात. त्यात एकसूत्रीपणा नाही. नाटकांच्या ओळींची संख्या हा सातत्याने संशोधनाचा विषय आहे. नाटकातील अवतरणे देताना 'हॅम्लेट'मधील व 'कोरिओलेनस्' मधील अवतरणे गाळली आहेत. संदर्भग्रंथांची यादी देताना अत्यंत महत्त्वाचे समीक्षक व समीक्षाग्रंथ यांचा उल्लेख आढळत नाही. कोलरिज्, डोव्हर विल्सन्, विल्सन् नाईट्, ग्रॅन्व्हिल् बार्कर, एल.सी. नाईट्, ट्रॅव्हेर्सी इ. समीक्षकांसह 'शेक्सपीअर सर्व्हे' ह्या महत्त्वाच्या नियतकालिकाचाही उल्लेख नाही. पात्रांच्या नावांच्या प्रचलित उच्चारात ('इयागो' ऐवजी 'अयागो') काही ठिकाणी प्रमाद आहेत. मराठी व इंग्लिश मुद्रणदोष बरेच आहेत. (अगदी Tragedies ह्या शब्दापासून Iago ह्या शब्दापर्यंत) सर्वात अक्षम्य मुद्रणदोष म्हणजे पृष्ठे क्र. ६६, ६७, ७०, ७१, ७४, ७५, ७८, ७९ छापली गेलेली नाहीत. कॉन्टिनेंटल प्रकाशनाकडून हे अपेक्षित नाही. "सदसद्विवेकबुद्धी" हा शब्द सातत्याने सद्सद्विवेकबुद्धी" असा आढळतो. हा मुद्रणदोष असावा काय? हॅम्लेटच्या संदर्भात हा शब्द अप्रस्तुत आहे. तेथे conscience चा अर्थ जाणीव असा आहे. तथापि मराठी वाचकांना व अभ्यासकांना शेक्सपीअरच्या महत्त्वाच्या शोकनाट्यांचा परिचय करून देण्यात हा ग्रंथ बराच यशस्वी झाला आहे. त्याचे श्रेय श्री. देशपांडे ह्यांना निश्चितच आहे.

**प्रा. डॉ. अ.पां. दाणी**

**






प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई

पु न र्मु द्र ण

# हिंदुधर्माची समीक्षा

(तिसरी आवृत्ती)

आणि

# सर्वधर्मसमीक्षा

(पहिली आवृत्ती)

## तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या
वैचारिक वाटचालीतील टप्पे स्पष्ट करणाऱ्या,
ऐतिहासिक महत्त्व असलेल्या
दोन पुस्तकांचे एकत्रित पुनर्मुद्रण

पृष्ठे २२५

किंमत रु. १७५/-

*संपर्क :* चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)







अनुक्रमणिका

सर्वधर्म अध्ययन केंद्र
प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई



*दुसरी संवर्धित आवृत्ती*

# हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन

## मे.पुं. रेगे

भारतातील नवसमाजउभारणीचे ध्येय साधण्यासाठी आधारभूत होऊ शकणाऱ्या भारतीय नैतिक-आध्यात्मिक परंपरेचे सुबोध दिग्दर्शन करणाऱ्या ग्रंथाच्या या संवर्धित आवृत्तीत प्रा. शि.स. अंतरकर आणि प्रा. स.ह. देशपांडे यांचे परीक्षण लेख, प्रा. मे.पुं. रेगे यांनी प्रा. अंतरकर यांच्या परीक्षणाचा घेतलेला परामर्श आणि प्रा. स.ह. देशपांडे यांच्या परीक्षणाचा प्रा. रेगे यांच्या विचारव्यूहाच्या संदर्भात श्री. वसंतराव पळशीकर यांनी केलेला उहापोह या नवीन मजकुराचा समावेश आहे. सद्यःस्थितीत अत्यंत प्रस्तुत असलेला हा ग्रंथ आपल्या संग्रही हवाच.

पृष्ठे २१५ किंमत रु. १६०/-

*संपर्क :* चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)

अनुक्रमणिका







रजि. क्र. 11697/57



मालक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




